सत्कार्योत्तेजक सभा-धुळें

[ श्री रामदास आणि रामदासी मासिक पुस्तक
वर्ष १२ वें, चैत्रवैशाख १८५४, अंक १४३-१४४ ]



# श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार

वगैरे

खंड पांचवा



सचित्र

# श्रीसमर्थमंदिर—जांब

## श्रीसमर्थांची प्राणप्रतिष्ठा

१८५४ चैत्र शुद्ध ९ शुक्रवार



नित्य घडो लोकां दर्शन स्वामीचें।
सर्वांचे मनींचें पूर्ण व्हावें ॥



हें पुस्तक वि. ग. जावडेकर यांनीं धुळें येथें
आत्माराम छापखान्यांत गल्ली नं. २-१२ मध्यें छापिलें व
शंकर श्रीकृष्ण देव यांनीं ९-१८ मध्यें प्रसिद्ध केलें.



१८५४ वैशाख शुद्ध १३



किंमत एक रुपया

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थमंदिर—जांब

## अनुक्रमणिका

( १६१ )

### स्वाहाकार, अर्चा, प्राणप्रतिष्ठा



( १६२ )

### श्रीसमर्थमंदिर—जांब

# चित्रांची यादी व अनुक्रम





श्री

# रामदास आणि रामदासी

## मासिक पुस्तक

## श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार

वगैरे

खंड पांचवा

( १६१ )

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचा जमाखर्च वगैरे

१८५३ फाल्गुन शु. ४ ( ११-३-३२ ) पासून
१८५४ वैशाख शु. १ ( ६-५-३२ ) पर्यंत

### स्वाहाकार, अर्चा, प्राणप्रतिष्ठा

| जमा | खर्च |
|---|---|
| ३० अहमदाबाद-अनंत सखाराम वणीकर | ४७६६·९·० स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नांवें |
| २० अर्चेसाठीं | ५०० ता. २०।३।३२ |
| १० एप्रिलचे | ८ ,, २५।३ |
| ५ बंगलोर-डॉ. जगन्नाथ वासुदेव कर्वे, पंचविसांपैकीं शेवटचा हप्ता | १५ ,, २९।३ |
| | ४५० ,, ३।४ |
| | ४० ,, ५।४ |

२५ खेड, जि. रत्नागिरी–दामोदरपंत बर्वे वकील यांनीं जमवून पाठविले

५ मुंबई–विठ्ठलदास अच्युत केणी यांनीं जमविलेले

११ मुंबई–भास्कर विष्णु गाडगीळ हस्तें विष्णु गणेश

१ मुंबई–वामन गणेश गाडगीळ

१७४ जांब–बाळाजी त्र्यंबकाजी पाटील, ( हल्लीं २०० चे सुरती १७४ )

१०० पेठ, ता. वाळवे, जि. सातारा–बाळकृष्ण बोवा रामदासी

१०० इंदुर–श्री. सरदार माधवराव किबे साहेब

५०० इंदुरबोधन–नरसा गौडा साहेब ( शिवाय १५२ सभेकडे ) ( हल्लीं ७५० चे सुरती ६५२ )

१०१ मिरज–श्रीमंत सरकार बाळासाहेब पटवर्धन

१२५ हैद्राबाद–श्रीमंत बाई राजे

२०० मुंबई-ती. रा. रा. कै. गंगाधर लक्ष्मण गोखले, हस्तें रा. रामचंद्र वामन पटवर्धन, विले पार्लें

५० माटुंगा–" उत्सवाच्या विशेष चांगल्या भागाकडे खर्चावे "

८० मद्रास–केशव नारायण कोटनीस ( शि. २१ स. )

९० ,, ६।४
७५० ,, ९।४
४१० ,, १२।४
४०० ,, १४।४
२४० ,, १७।४
७०८१० ता. १७।४
१९८१८३,, १७।४
१८७८३,, १८।४
७०० ,, १९।४
२५० ,, १९।४
२८१३८६,, १९।४
१७४ ,, १९।४
५७०८३ ,, १९।४
५०८६ ,, १९।४
१५ ,, १९।४
१० ,, ३।५

५४- ७-६ टपालखर्च – रजिस्ट्रेशन, इन्शुअरन्स, वगैरे
४५- ८-० प्रवासखर्च
१९५-१२-६ आचारी — राजेश्वर आय्या वगैरे पांचजण
१५- ८-० छापणावळ
१३- ४-० किरकोळ सामान खरेदी
१५- ०-० फोटोग्राफर
२- ८-० स्टेशनरी
१- ४-० चेक वटणावळ

५१११-१३-० एकूण खर्च

४०-१२-० कल्याण–श्रीसमर्थभक्त गोसेवक दादा गोखले यांचे मार्फत
११८४ दिनकर धोंडदेव ब्रह्मे यांनीं जमविले
१० डोंबिवलीचे गो. ह. गोखले, धों. म. दाते, ठाण्याचे वा. रा. घोलप, वि. म. पटवर्धन, पां. गो. पिंपळखरे, कल्याणचे रं. भा. दार्णी, वि. अ. रसाळ, वि. ग. आठवले, ना. वि. वैद्य, व मालाडचे वा. कृ. जोशी, प्र. १
१५४ किरकोळीनें
१० कृष्णाजी महादेव
३ सीताराम
२ काकडे, बा. ना. बर्वे, प्र. १
११ कोणाचे तरी
३८८ किरकोळ
२ तंजावर-गोपाळराव पेशवे
१० मुंबई–य. का. मराठे
२१ मुंबई–रामनारायण परशुराम
११ मुंबई–पी. के. पाध्ये
४५ गदग–जी. डी. ढवळे
२-४ इगतपुरी–केशव एकनाथ मंत्री
५ देवरुख-- विनायक वामन केतकर, वकील
५ मालवण--रेंवतलें--दत्तात्रय जयराम प्रभुदेसाई
३ अमळनेर–तु. स. पाठक
१० मुंबई–सखाराम चिमणाजी
१ बुधगांव--बाजीराव रघुनाथ भट
११ मुंबई–दत्तात्रय विनायक पेंढरकर
१० मुंबई–कै. सौ. लक्ष्मी नारायण नवरे, राहणार गुजराळी, तर्फ धोपेश्वर, ता. राजापूर, यांच्या अंतकाळच्या इच्छेप्रमाणें, हस्तें ना. पां. नवरे
१ कुर्ला–वामन सिद्धेश्वर जोशी
१-४ ‘ग्रस्तोदयचंद्रग्रहणपरिहारानिमित्तम् ’ हस्तें ना. पां. नवरे

१ 'श्रीरामदासांची कविता, प्रथम खंड' पारायणसमातीप्रीत्यर्थ ता. २६।३।३२

१० आडिवरें--स्वयंसेवक हरी रामचंद्र जोशी यांचे मार्फत

४ चालक श्रीराम औषधालय

२ कृष्णाजी रामचंद्र हर्डीकर

४ शं. का. नाटेकर, लक्ष्मण वि, य. त्र्यं. दाते, श्रीराम औषधालय, प्र. १

५ अंजनवेल-- गोपाळ गणेश आचवल

२ नागपुर-- जी. बी. देशपांडे

१ दिल्ली-- एस्. जी. सहस्रबुद्धे, हस्तें य. गो. जोशी

५ अहमदनगर-- रणछोड रावजी देशपांडे

५ मुंबई-- मोरेश्वर शंकर

५ दादर-- बापु श्रीधर बारजे

२५ पुणें-- लक्ष्मण नरहर नातु, आत्याबाईच्या इच्छेनुरूप

३ पुणें-- रामचंद्र ना. पिल्ले

२ ब्रह्मपुरी-- हरी गणेश आंबेकर

५ मूर्तिजापूर-- जी. के. देशपांडे

२१ माजगांव--शांतारामचाळ उत्सवमंडळामार्फत लोकमान्यपुण्यतिथी-निमित्त, हस्तें के. एस्. खाडिलकर, धुं. वि. मराठे याकारितां

५ शेगांव--विष्णु काशीनाथ मंडपे

५ जबलपुर--श्री. राधाबाई विद्वांस

१० सोलापुर--मुरलीधर नारायण सलगरकर, वकील

१० जमखिंडी–रामचंद्र केशव बाळ

१० अकोला–त्रिंबक बाळकृष्ण जोग, मातुःश्री गोपिकाबाई जोग यांचे स्मरणार्थ

५ मुंबई–कै. सौ. लक्ष्मीबाई पुरोहित यांचे स्मरणार्थ, वामन यशवंत पुरोहित

२६ मंगळूर–वैद्य दुर्गाराम बाल हरिदास

१० मालगुंड–गोविंद विनायक केळकर

१० देवरुख–जयराम विष्णु वैद्य

| | |
|---|---|
| ५ | नाशिक–दामोदर चिमणाजी लष्करे |
| ३० | मुलुंद–वासुदेव पुरुषोत्तम साठे |
| ५ | मार्शेल--गोवा--श्रीदुर्गादत्तमंदिर, हस्तें श्री. रामचंद्र कृष्ण कामत |
| ५ | कऱ्हाड--गणेश नारायण गराडकर |
| ५ | ठाणें--बाजीराव रामचंद्र बाळ |
| ५ | ठाणें--रामा शेट |
| १ | श्रीनिवास महारुद्र यवतेकर |
| १ | इसलामपुर--विनायक शंकर शिराळकर |
| १ | दभोई--बापु रंगनाथ जेजूरकर |
| १० | धुळें--रामेश्वर जोहारमल |
| १०४ | धुळें--द्वारकाताई दुगल |
| ११ | धुळें--सौ. सत्यभामाबाई भट |
| १ | धुळें--जामखेडकर |
| ११ | इंदुर--मुकुंद वामन बर्वे |
| ५ | पुणें--वासुदेव नारायण विद्वांस |
| २ | कल्याण--कृष्णाजी मोरेश्वर अभ्यंकर |
| १० | सोनगीर--केशवदत्त महाराज हस्तें श्री. बारगळ |
| ५ | तळोदे-कुकुरमुंडे--संतोजी महाराज हस्तें श्री. बारगळ |
| ५ | स्वयंसेवक गणेश काशीनाथ पिंपळखरे, जळगांव, मार्फत<br>४ आणासाहेब इनामदार, द. त्रि. नायगांवकर, आर. वाय. प्रचंड, मेणकी, प्र. १<br>१ किरकोळ ( देवकर, गर्गे ) |
| ५ | डोमगांव--यशवंतराव पोळ |
| १३ | ठाणें--श्रीदासनवमीमहोत्सव, हस्तें हरिभाऊ धाणेकर |
| ३ | ठाणें--दत्तात्रय रामचंद्र विद्वांस, हस्तें ,, ,, |
| ६ | शिरोडें--रामचंद्र वासुदेव कापरे |
| ३३ | स्वयंसेवक दिनकर महादेव खेर, फैजपुर, यांचे मार्फत<br>५ श्रीमती आनंदीबाई साहेब देशमुख, सावदे<br>२ जाधवजी कानजी शेट<br>२१ ना. रा. दलाल व सो. शं. चोपडेकर मिळून, दे. द. चौधरी, अ. रा. कुळकर्णी, गोविंद शेट भावसार, सु. चु. |

भावसार, गु. ता. भावसार, वि. दे. नाईक, आ. प. नाईक, सु. दे. वाणी, दा. बा. मालेगांवकर, के. मा. भाट्ये, का. सी. भावे, प्रे. म. चौधरी, वि. फ. परदेशी, के. इ. भावसार, तु. प. शेट, ग. प्र. भागवत, म. गो. गाजरे, द. सी. सप्रे, ग. गो. भावे, दि. म. खेर, प्र. १

५ किरकोळ ( दहाजणांचे प्र. ८८ )

५७-१-० मुंबई श्रीसमर्थसेवक विष्णु गणेश गाडगीळ यांचे मार्फत

८८ मागील बाकी

५ कृष्णाजी विनायक भागवत

५ विनायकराव भावे यांचे मार्फत

५ श्रीसमर्थकृपाकांक्षी, हस्तें सौ. रुक्मिणीबाई

५ जयराम नारायण गोखले

२ भगवंतराव चव्हाण

१८४ महादेव कृष्ण भुस्कुटे

२८ ज वि. पंडित, स. ग. आठवले, ना. दा. करमरकर, वि. ग. मोडक, द. ग. मुळेकर, बा. ल. भट, चिं. र. पंडित, बा. कृ. गोडबोले, य. ज. फाटक, आ. रा. ठाकूर, य. म. पेंढरकर, रा. दि. नेने, ना. गो. तांबवेकर, मु. न. उपाध्ये, वि. गो. पटवर्धन, वि. ल. कोल्हटकर, वा. ता. वर्तक, वि. वा. गाडगीळ, प. वा. गाडगीळ, द. वि. सुभेदार, द. रा. चंदावरकर, वा. ब. बा., रा. पां. शेवडे, ल. श्री. महाजन, धों. ग. नवरे, वा. मि. घाणेकर, के. इ. फडणीस, ग. वा. बापट, प्र. १

५८५ किरकोळीनें

६-४-० पंढरपूर--हरी पंढरीनाथ बहिरट याजकडून

५ वै. ती. पंढरीनाथ भगवंत बहिरट ( निधन फाल्गुन शु. ५ शके १८५३ ) यांचे स्मृत्यर्थ

१८४ वै. ती. दत्तात्रय वामन कासेगांवकर ( निधन माघ शु. ९ शके १८५३ ) यांचे स्मृत्यर्थ

१५ मुंबई–नानासाहेब

१० बडोदें–गंगुताई बक्षी
५ विजापुर–गुजराथ–विष्णु बळवंत फणसे, विनायकराव गडकरी व कोरडे मिळून
५ नामपल्ली–हैद्राबाद–महादेव मुरहरी हुंडेकर
२५ सांगली–श्रीरामकृपा ( कायम निधीसाठीं )
१० बडोदें–गणपतराव पीराजी वसईकर ( सनईवाले )
१ औरंगाबाद–नारायणराव कारकून
१ एलिचपुर–मुकुंदराव देशपांडे
२ जामनेर–गणपतराव देशमुख
२ जळगांव–श्रीसमर्थकृपा दोघे जण
१ भुसावळ–बंडु विठ्ठल पाठक
४९ मुंबई–श्रीसमर्थकृपा
५ बडोदें–बळवंत वामन महाबळ
५ नाशिक–पुरुषोत्तम वामन वैशंपायन
१ नाशिक–व्यं. स. सावरगांवकर
५ ठाणें–वासुदेव विष्णु कुळकर्णी
६८१ ठाणें–विनायक अनंत वाघ मार्फत
५ शंकर सदाशिव पराडकर
१८१ वि. अ. वाघ
१ ठाणें–वि. रा. कापरेकर
१ ठाणें– विष्णु ग. गांगल
२७ ठाणें–श्रीसमर्थसेवकमंडळ
२ जालना–नागनाथ वि. पुंड
१८१२ वैजापुर–नारायण काशीनाथ
१८१२ औरंगाबाद–हणमंतराव वैष्णव
१ ठाणें–गो. ना. आठवले
१ मुंबई–नारायण वि. केळकर
१ जालना–दत्तात्रय दाभाडीकर
५ दादर–के. बी. जोशी हस्तें भागवत
५ बेंगळूर–व्यं. ना. कल्याणपुर

८ कल्याण–हरी कृष्ण भिडे
५ विलेपार्ले–जगन्नाथ काशीनाथ सोमण
५ कल्याण–शंकर गोविंद गोखले
५ चाळिसगांव–बाळकृष्ण विठ्ठल सहस्त्रबुद्धे
२ चाळिसगांव–सदाशिव नारायण करंदीकर
२ चाळिसगांव–विनायक परशुराम भागवत
५ पुणें–नारायण विष्णु आठवले
१५ नागपुर–डॉ. एल्. व्ही. परांजपे
५ वरोरा–डॉ. रामचंद्र मिठुराम तेलंग
१ वरोरा–डी. बी. दंडे
५ ठाणें–धोंडु आगाशे
५ मनमाड–चिंतामण हरी गोखले
५ सोलापुर- शंकर परशुराम कारखानीस
५ फैजपुर--दिनकर महादेव खेर
२ श्री. सरस्वतीबाई भ्र. गणेश नारायण कुळकर्णी
१ श्रीसमर्थकृपा
५ पुणें--श्री. सीताबाई पाटणकर
५ पुणें--श्री. राधाबाई गद्रे
५ कल्याण--श्री. सीताबाई फडके
२ कल्याण--श्री. रखमाबाई गोखले
२ कल्याण--श्री. कुसाबाई मेहेंदळे
४ सांगली–श्रीरामकृपा
५ डोमगांव--मठपति हनुमंत श्रीराम
२ डोमगांव–जयवंतराव पोळ
२० सौ. उमाबाई जांभेकर, श्री. रमाबाई बाके, श्री. सुंदराबाई जांभेकर, श्री. मीनाक्षीबाई तांबे, प्र. ५
५ मालेगांव--चिंतामण दामोदर ऊर्फ बापुभट जोशी
१९ श्री. रंगुताई लिंबकर
५ कऱ्हाड–बाळकृष्ण व्यंकटेश देशपांडे
१ परंडा–यशवंत वासुदेव कुळकर्णी

२ परंडा—श्रीनिवासराव वकील
२ परंडा—लक्ष्मणराव वकील
२ परंडा—गोपीनाथराव वकील
१ परंडा—विनायक रघुनाथ देशपांडे
१०८४ बांधणवाडी – राधाबाई केतकर हस्तें म. ना. वझे
१ श्री. मय्या केजकर
२ सांगली – बाबुराव बाळकृष्ण गोरे
१ बेळगांव – श्रीकृपा ( वि. पु. )
१ पुणें – विष्णु कृष्ण
३२३-९-६ जांब – चैत्र शु. ९, १०, ११ या तीन दिवसांत श्रीसमर्थांपुढें तबकांत, पेटींत वगैरे आले ते. त्यांत एक चिठ्ठी ' रु. ५ भास्कर विनायक जावडेकर, आनंदी बझार, जोशी वाडा, अहमदनगर ' अशी आहे.
११ श्रीसमर्थमंदिरकलशदर्शन
१ श्रीसमर्थकृपा

२८५०-३-६ एकूण नवीन जमा
८३-२-६ शिखरासाठीं ता. १४।११।३१ रोजीं रु. १०१ ८५ ८९ ची चांदी खरेदी केली होती ( पहा अंक १३९, लेखांक १५० ), तिची जरूरी लागली नाहीं, सबब ती विकून ता. २५।४ रोजीं किंमत आली ती.

२९०३-६-० एकूण जमा
४४२५-११-९ मागील शिल्लक

७३२९- १-९ एकूण जमा
५१११-१३-० एकूण खर्च वजा

२२१७- ४-९ एकूण शिल्लक, पैकीं
८८४-१३-६ धुळ्याचे पोस्टल बँकेंत
१२६८- ५-० सत्कार्योत्तेजक सभेकडे
६४- २-३ चिटणीसाजवळ वरती

२२१७- ४-९

सोनें मिळालें होतें, तें कळसाला लागलें; इतर वस्तु मिळाल्या होत्या, त्या श्रीसमर्थचरणीं अर्पण झाल्या.

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये ४६५७६-११-३

धुळें
१८५४ वैशाख शु. १ } शंकर श्रीकृष्ण देव

ता. क. वरील जमेकडील रकमांपैकीं फार थोड्या टपालानें आल्या आहेत, बहुतेक रकमा जांबेस च मंडळींनीं दिलेल्या आहेत.

स्वाहाकार, अर्चा, अन्नसंतर्पण इत्यादि बाबतींत झालेला खर्च तपशील-वार या अंकांत देण्याचा विचार होता, पण स्थापत्यविशारदाकडून तपशील न आल्यामुळें तो या अंकांत देतां आला नाहीं, तो पुढें देऊं. स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं, खर्चाकडील ठोकळ ५१११ मध्यें फार तर १५०० मंदिराप्रीत्यर्थ खर्च असेल, बाकीचे ३६११ चा खर्च प्राणप्रतिष्ठेसाठीं झाला असावा. याशिवाय निदान सुमारें २००० रुपये श्रीमंत वामन नाईक साहेब यांनीं खर्च केले असावे. कांहीं बिलें अजून द्यावयाचीं आहेत. म्हणजे प्राणप्रतिष्ठेच्या समारंभाचा खर्च ६००० च्या आंत बाहेर झाला असावा, असें दिसतें. नक्की तपशील पुढील एकाद्या अंकांत देऊं.

स्थापत्यविशारद वासुदेराव गोगटे यांस आतां दुसरीकडे जावयाचे होते व विशेष महत्त्वाचीं कामें हि उरलीं नाहींत, म्हणून त्यांस ता. १।५ पासून रजा दिली. टापटीप, दक्षता, सावधानता हे गुण वासुदेवरावांत मला विशेष दिसून आले, व ते त्यांच्या भावी उत्कर्षाला कारणीभूत होतील, अशी मला खात्री आहे. बऱ्या च कामगारांना हि आतां रजा देण्यांत आली आहे. मंदिराचीं अशीं कामें आतां थोडीं उरलीं आहेत. सभामंडपावरील गलथा, प्राकाराच्या भिंतीवरील एक थर व गलथा, प्राकाराच्या भिंतींतील पूर्वपश्चिम बाजूचे लहान दरवाजे किंवा दिंड्या व समोरचा उत्तरेकडील मोठा दरवाजा, मागील ओवऱ्यांचें उरलेलें काम व चौफेर फरशी, सभामंडपाच्या बाजूच्या दोन वाटा व समोरील तीन खण यांत घडीचे लोखंडी सुंदर दरवाजे व आणखीं कांहीं किरकोळ कामें, एवढीं च कामें उरलेलीं आहेत. तीं संपल्यावर तूर्त काम बंद ठेवावें व पुरेसा निधी जमल्यावर पुन्हां बाकीचीं कामें सुरू करावी, असा विचार केला आहे.

पूजा अर्चा, ध्यान धारणा, जप जाप्य, श्रवण मनन, अध्ययन अध्यापन, इत्यादि नित्यक्रमासाठीं चार पांच निष्ठावंत, निस्पृह रामदासांकित श्रीसमर्थसेवक नित्य श्रीसमर्थांपाशीं राहणार आहेत. म्हणजे यापुढें श्रीसमर्थांप्रीत्यर्थ दरमहा ८० ते १०० खर्च येणार आहे. त्याची योजना महाराष्ट्र सहज करील, असा मला भरंवसा आहे. पैसा हा निर्जीव आहे, तो जरूर तेवढा सहज मिळूं शकतो. श्रीसमर्थांच्या कार्यासाठीं शेतजमिनी मिळत आहेत. परंतु जमिनीच्या उत्पन्नाची शाश्वती नसते, म्हणून दहा वीस हजार रुपये मिळवून ते श्रीमंत नाईक साहेब, श्री. गोविंदराव नानल साहेब, श्रीमंत नानासाहेब धामणगांवकर अशांच्या नांवावर एकाद्या बॅंकेंत ठेवले म्हणजे नित्यक्रम निर्वेधपणें चालण्यास प्रत्यवाय उरणार नाहीं.

गेल्या अंकांत सभेकडून जीर्णोद्धाराचें येणें १४६६-५ होतें. त्यांत १५२ निजामाबादचे श्रीमंत नरसा गौडा साहेब यांचे, २१ मद्रासचे श्री. केशवराव कोटनीस साहेब यांचे व कलकत्याचे श्री. भा. ब. ढवळे यांचे कडून केवळ सभेच्या कर्जफेडीकरितां म्हणून आलेले रुपये २५, मिळून रु. १९८ ची फेड होऊन आतां १२६८-५ सभेकडून येणें राहिले आहेत.



॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थमंदिर–जांब

# श्रीसमर्थमूर्तीची प्राणप्रतिष्ठा

### १८५४ चैत्र शुद्ध ९ शुक्रवार

लवे नेत्रपातें स्फुरे आजि बाहे ।
समर्थ प्रभु येथ येणार आहे ।
जयाचेनि योगें सुखानंद लोटे ।
तया देखतां अंतरीं बाष्प दाटे ॥

श्रीसमर्थमंदिरांत श्रीसमर्थांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा होऊन

### मंदिराचा सोन्याचा कळस

आज दृष्टीस पडला ! आजचा दिवस महाराष्ट्राच्या परम भाग्याचा होय ! त्याच्या पोटांत काय सांठविलेलें आहे, सांगतां येत नाहीं.

येथुनी वांचती सर्वै । ते ते सर्वत्र देखती ॥

आपणांस आज फक्त इतकें च दिसत आहे कीं, आज ३२४ वर्षांनीं श्रीसमर्थ जांबगांवीं आपल्या घरीं पुन्हां अवतीर्ण होत आहेत. प्रसंग अपूर्व होय. मजविषयीं खाजगी पत्रांत वा वर्तमानपत्रांत कोणी कांहीं हि म्हटलें, तरी त्यानें फसून जाण्या इतका मी अजून अंध किंवा वेडा बनलों आहे, असें वाटत नाहीं. एकादाच्या वर्तनावरून जगानें वाटल्यास आपली फसवणूक करून घ्यावी, पण कोणी हि केंव्हां हि स्वतःच स्वतःची वंचना करून घेऊं नये. व्यक्तिशः मी कोण्या झाडाचा पाला ! माझें काय सामर्थ्य होतें, किंवा माझी काय पुण्याई

होती, कीं श्रीसमर्थांनीं अवतीर्ण व्हावें ? बृहन्महाराष्ट्रांतील लक्षावधी महाराष्ट्रियांच्या अंतःकरणाला जी तळमळ लागली आहे, हजारों महाराष्ट्रियांच्या ठिकाणीं श्रीसमर्थांविषयीं जो प्रेमादर वसत आहे, किंवा शेंकडो श्रीसमर्थभक्त प्रत्यहीं श्रीसमर्थचरणांना प्रेमाश्रूंनीं जें न्हाऊं घालीत असतात, त्या सर्वांचें फळ म्हणजे आज झालेली श्रीसमर्थांची प्राण-प्रतिष्ठा होय ! आज जे येथें हजारों लहानथोर लोक आले आहेत, ते काय मी आमंत्रण दिलें म्हणून आले आहेत? मला हें सरळ दिसत आहे कीं, सर्वांची दृष्टि पुनरपि श्रीसमर्थचरणांकडे वळली आहे. सर्वांचे शुद्ध संकल्प फलद्रूप झाल्यावांचून राहणार नाहींत. श्रीसमर्थांना करुणा आली च पाहिजे. अवतार घेतल्यावांचून त्यांना गत्यन्तर कोठें आहे ?

आजची प्राणप्रतिष्ठा ही त्या अवताराची पूर्व तयारी होय. श्रीसमर्थांना जन्मून आज बरोबर ३२४ वर्षें झालीं. त्यांचा जन्म शके १५३० त, चैत्र शुध्द ९ स, बरोबर श्रीरामजन्माचे वेळीं च झाला. ही या चरित्राची पहिली च अपूर्वता होय. असें दुसरें उदाहरण, पुराणांत इतिहासांत किंवा कोठें हि, कोणाच्या वाचण्यांत किंवा ऐकण्यांत आलेलें आहे काय, कीं ज्या मितीला—नव्हे ज्या क्षणाला—आपल्या उपास्य दैवताचा जन्म झाला, त्या च क्षणाला भक्ताचा हि झाला ! श्रीसमर्थांच्या अवतारकार्याची ही च पहिली साक्ष होय. ही दंतकथा नव्हे, हा इतिहास आहे :

पुढें प्राप्त जाली श्रीरामनौमी । समर्थमाता बैसली जपध्याननेमीं ।
कथाकीर्तनें होती स्वधामीं । आत्मयारामीं स्वानंदें लोक ॥ स. प्र. १/५१
उपाध्यायासी करीं दिधली सुपारी । ब्रह्मसंतर्पणें होती देवघरीं ।
तव माध्यान्ह नौमीचे अवसरीं । समर्थगर्भ प्रगटला ॥ ५२
जयजयकार सर्वत्रीं केला । श्रेष्ठासी समर्थ बंधु जाला ।
श्रीरामराज केवळ हनुमानरूपें अवतरला । ब्राह्मणरूपें जगद्गुरु ॥ ५३

बाळपणाचीं बारा वर्षें जांबेस काढून १५४२ त श्रीसमर्थ लग्नसमारंभांतून निसटले, त्यास आज ३१२ वर्षें झालीं. जांब

सोडल्यावर पुरश्चरण आणि तीर्थाटण संपवून कृष्णातटाकाला जाण्यापूर्वीं एकदां १५६६ त ते कांहीं काळ जांबेस आले होते, त्यावर पुन्हां १५७६ च्या सुमारास आले होते व नंतर हि कदाचित् एक दोनदां आले असतील, पण ३१२ वर्षांपूर्वीं त्यांनीं जें एकदां जांब सोडलें, तें रहावयास असें पुन्हां ते जांबेस आले च नाहींत. तें आज आतां कायमचे आले आहेत.

आज मला साहाजिक

## गेल्या २८ वर्षांपासूनच्या आठवणी

होत आहेत. १८२६ च्या मार्गशीर्षांत प्रथम जांबेस आलों तो दिवस चांगला आठवतों. अर्धा कोस गांव राहिलें तों श्रीराममंदिराचें शिखर दृष्टीस पडलें, तेव्हां किती धन्यता वाटली. पंचवटी, मारुती, पार, राममंदिर, तुपाची घागर, ओढा, डोह, वडाचें झाड, रामजी आणि शामजी यांच्या समाधी, ज्या मळ्यांतील जोंधळ्याची भाकरी श्रीसमर्थांनीं खाल्ली तो देवमळा, ज्या विहिरीचें पाणी ते प्याले ती विहीर, त्यांचें घरठाण, पडकी गढी, पाटलांचीं घरठाणीं, इत्यादि संस्मरणीय पवित्र वस्तु आणि ठिकाणें पाहून मनाला काय वाटलें त्याची आठवण बुजणें कसें शक्य आहे? ज्या जागेवर आज श्रीसमर्थमंदिर उभारण्यांत आलें आहे, तेथें त्या वेळीं एक तीन चार खोल्यांचें लहानसें घर होतें. मुख्य गाभाऱ्याच्या दक्षिण बाजूच्या पलिकडील एक फुटापासून तों सभामंडपाच्या उत्तरेकडे चवदा फुटापर्यंत त्या घरानें जागा व्यापिली होती. त्याचा दरवाजा पश्चिमेकडे होता. त्या दरवाज्यानें आंत शिरतां च एक लहानसें मोकळें आंगण होतें. आंगणाच्या डाव्या बाजूस गुरें बांधण्याचा सोपा होता. दरवाज्या समोर, आंगण टाकून पलिकडे, लहानशा जोत्यावर तुळशीवृंदावन होतें. वृंदावनासरसी लहानसी ओसरी व ओसरीला लागून मागच्या बाजूस दोन खोल्या होत्या. उजव्या हातच्या खोलीचा उपयोग देवघरासारखा होई व डाव्या हातच्या



जांब येथील मारुतीचें देवालय



जांब येथील डोहाची जागा

खोलीचा स्वयंपाकाकडे होई. खोल्यांच्या मागें एक आंगण होतें व ओसरी आणि स्वयंपाकघर यांच्या उत्तरेस दुसरें एक लहानसें आंगण होतें. दोन्ही आंगणांत मोरीचे दगड होते. संपलें, एवढेंच सारें घर होतें. जेथें देवघर म्हणून होतें, त्या जागीं श्रीसमर्थांचा जन्म झाला होता व आज त्या च जागीं श्रीसमर्थमंदिराचा गाभारा असून त्यांत श्रीसमर्थ विराजमान झाले आहेत. या जुन्या घराच्या बाबतींत क्वचित् कोठें कोणाचा अकारण गैरसमज झालेला आढळतो, तो दूर केला पाहिजे. तें तीन खोल्यांचें घर श्रीसमर्थकालीन असतें किंवा पुरातन असतें, तर तें जसेंच्या तसें च स्मारक म्हणून ठेवलें असतें व पाऊस-वाऱ्यापासून त्याचें रक्षण व्हावें म्हणून, फार तर, त्याच्यावर सोन्याचा पत्रा पसरावा म्हणून बृहन्महाराष्ट्रांत दौरे काढले असते. पण तसें कांहीं नव्हतें. घर जुनें नव्हतें. त्या खोल्या अगदीं सामान्य असून दहा वीस वर्षांतल्या होत्या, इतकें च काय, पण पुढें तीन वर्षांनीं पुन्हां जांबेस गेलों होतों तर इकडची भिंत तिकडे व तिकडची इकडे होऊन खोल्यांच्या स्वरूपांत हि बदल झाला होता.

घर श्रीसमर्थांच्या वेळचें राहिलें नव्हतें, पण त्यांच्या घराची जागा मात्र ही खरी.

## ही ती जागा,

ज्या जागेवर त्यांचा देह धरणीनें प्रथम झेलला, ही च ती जागा, जेथें श्रीसमर्थ अकरा वर्षांचे असतां एकांतांत विश्वाच्या कल्याणाची चिंता करीत बसले होते. त्या वेळीं ते समर्थ म्हणून ओळखले जात नव्हते. नुसते नारायण होते. वडील निवर्तले होते. वडील बंधु गंगाधर तरी यांच्या पेक्षां अवघ्या तीन च वर्षांनीं मोठे होते; हे ११ वर्षांचे आणि ते १४ वर्षांचे. गंगाधरपंतावर चवदाव्या वर्षीं च कुळकर्णपणाची जबाबदारी येऊन पडली होती. तेव्हां एके दिवशीं नारायण बाहेरून नाना तऱ्हेचे खेळ खेळून घरीं आले असतां आई त्यांस सहज म्हणाली, नारायणा, तूं

हि कांहीं आतां अगदीं लहान नाहींस, गंगाधर तरी तुझ्या पेक्षां असा किती मोठा आहे, तेव्हां तूं त्याला कांहीं मदत करीत जा, कांहीं प्रपंचाची चिंता करीत जा. 'कांहीं प्रपंचाची चिंता करीत जा ' एवढी आईची आज्ञा ऐकून नारायण कोणास न कळत घरांतल्या अडगळीच्या खोलींत अडगळींत जाऊन आसनस्थ होऊन ध्यानस्थ बसले ! नारायण कोठें गेला, अजून कां आला नाहीं म्हणून आईनें शोध केला, पण तो कोठें आढळला नाहीं. येईल, असें म्हणून आई तिन्ही सांजा डाळ तांदुळ काढण्यासाठीं त्या अडगळीच्या खोलींत गेली, तों कोणास पाय लागला. कोण रे आहे येथें, म्हणून आईनें विचारलें. मी नारायण आहे, असें उत्तर मिळालें. नारायणा, तुला गांवभर शोधलें, येथें हा असा काय करीत बसला आहेस ?

बापा काय हें करितोसी येकांत स्थळीं ।

आईनें सांगितलें होतें, कांहीं प्रपंचाची चिंता करीत जा, आणि नारायण उत्तर देतातः

आई चिंता करितों विश्वाची ॥ स. प्र. २२

अशी जेथें एकांतांत बसून श्रीसमर्थांनीं विश्वाच्या कल्याणाची चिंता केली, तें हें ठिकाण होय !

या ठिकाणाहून श्रीसमर्थ वयाच्या बाराव्या वर्षीं निसटले ! ऐन लग्नसमारंभांतून ते फडकले. श्रीसमर्थचरित्रांत च केवळ नव्हे तर महाराष्ट्राच्या इतिहासांत मला तो क्षण अत्यन्त महत्त्वाचा वाटतो. हे ब्राह्मण 'सावधान सावधान ' कोणाला आणि कां म्हणत आहेत, असें श्रीसमर्थांनीं विचारलें नसतें, ते तुम्हांला म्हणत आहेत, आतां थोड्या वेळानें तुमचे पायांत सवा मणाची बेडी पडणार आहे, असा जवळच्या एका वृद्ध गृहस्थानें विनोद केला नसता, एक क्षण ओलांडता आणि अंतर्पाट दूर होता, तर आपले समर्थ आपणांस लाभले नसते. म्हणून ज्या क्षणीं श्रीसमर्थ या ठिकाणाहून निसटले तो क्षण मला फार महत्त्वाचा वाटतो.

समर्थलग्नआहुती जाली संपूर्ण ।
देवदेवकघटिका भरली नसतां पूर्ण ।
सावधान अंत्रपाटीं ऐकतां परिपूर्ण ।
पुण्या अनिर्वचनीं समर्थ निघाले ॥ २-३९
समर्थासी फावली मध्यरात्री ।
समर्थ कोण्हासी दिसतील चर्मनेत्रीं ।
समस्त लोक हाहाकारिती वग्त्रीं ।
सकळ साधुसंत म्हणती धन्य धन्य ॥ ४०
ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें ।
पूर्वीं अवतारादिकासी न जालें ।
मायामोहनीनें ब्रह्मादिकां भुलविलें ।
नाना पुराणें आम्ही ऐकिलीं ॥ ४१
समर्थदेवें ख्याती केली ।
सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली ॥

आज ही गोष्ट कौतुकानें सांगतांना आणि आनंदानें ऐकतांना धन्यता वाटते, हें ठीक, पण त्यावेळीं कोण हाहाकार, आकांत जाला असेल, याची कल्पना करावी. तत्काळ चहुंकडे शोध सुरू झाला असेल. नारायणाचा कोठें च शोध लागला नसेल, तेव्हां आईला किती दुःख झालें असेल ! आज येईल, उद्यां येईल, परवां शोध लागेल, अशी त्या माउलीनें दोन चार वर्षें, दहा पांच वर्षें वाट पाहिली असेल. किती हि काळ लोटला तरी आईला विस्मृति होणें शक्य च नव्हे, पण जसजशीं वर्षें जात चाललीं असतील, तसतशी नारायण परत येण्याची आशा नष्ट होत चालली असली पाहिजे. पंधरा वीस वर्षें होऊन गेल्यावर नारायण म्हणजे या जन्मीं आतां आपल्या नजरेस पडेल, अशी आशा हि उरली नसावी. सांगतात, रडून रडून आईचे डोळे गेले होते. तिकडे नारायण जे गेले ते गोदावरी उतरून दक्षिण तीरानें नाशकास गेले, पंचवटीजवळ टाकळीस राहिले, तेथें बारा वर्षें त्यांनीं तीव्र तप केलें, नंतर बारा वर्षें तीर्थाटण केलें, भरतखंडांतील सर्व तीर्थयात्रा केल्या. बारा वर्षें पुरश्चरण आणि बारा वर्षें तीर्थाटण अशीं

२४ वर्षें परमेश्वराची कृपा संपादन करण्यांत खर्चून, परमेश्वर आपलासा करून घेऊन वयाच्या छत्तिसाव्या वर्षी फिरत फिरत श्रीसमर्थ पैठणास आले. तेथें त्यांचें कीर्तन झालें. श्रीसमर्थांना गाण्याचें अंग अप्रतिम होतें. आवाज गोड आणि खडा होता. कोणी न सांगतां हि समजण्या-सारखें आहे कीं, श्रीसमर्थांच्या कीर्तनांत हजारों लोक तल्लीन होऊन डोलत असले पाहिजेत. साऱ्या च गोष्टी अनुकूल होत्या. शरीर धिप्पाड आणि पीळदार, डोळे सतेज आणि पाणीदार, अंतःकरणांत पूर्ण शांति, चेहऱ्यावर समाधानाचें सतत हास्य, आवाज अति मधुर, वक्तृत्व हृदयभेदक, वृत्ति सर्वस्वीं उदासीन, तात्पर्य लोकांचीं मनें आकर्षून घेण्याला कोणती च उणीव नव्हती. त्यांच्या नयनांत लोकांचे नयन हारपून जाऊन जनता बेभान होत असेल, याबद्दल मला शंका नाहीं. पैठणला कीर्तन झालें. कीर्तनांत एक वृद्ध गृहस्थ बसले होते. त्यांना ऐकून ठाऊक होतें, पण कीर्तनांत त्यांना त्याचें स्मरण होण्याचें कांहीं कारण घडलें नव्हतें. तथापि कीर्तन ऐकत असतां सहज कल्पनेचा एक तरंग त्यांच्या मनांत उठला कीं, पांच पंचवीस वर्षांमागें जांबगांवच्या सूर्याजी-पंतांचा मुलगा लग्नांतून पळून गेला होता, तो तर हा नसेल ना ? कीर्तन संपलें, समर्थ क्षणभर खालीं बसले, वृद्धानें विचारलें, महाराज, आपण मूळ राहणारे कोठचे ? जांबेचे, असें श्रीसमर्थांनीं उत्तर दिलें. जांबेचे असें ऐकतां च वृद्धाला शंका उरली नाहीं. गहिंवरून तो वृद्ध म्हणाला, महाराज, आपण हें सारें वैभव प्राप्त करून घेतलें, हें ठीक, पण तिकडे, तुम्ही गेल्यापासून रडून रडून मातुःश्रीचे डोळे गेले, तेव्हां मज म्हाताऱ्याची तुम्हांस आज्ञा कीं, तुम्हांस आणखी कोठें जावयाचें असेल तिकडे खुशाल जा, पण आतां एकवार आईला भेट-ल्यावांचून कोठें जाऊं नका. पैठणपासून जांबगांव पूर्वेस वीस कोस. समर्थ निघाले, जांबेस गेले, घरापुढें उभे राहिले आणि खड्या आवाजांत त्यांनीं एक श्लोक म्हणून रघुवीराचा जयजयकार केला. मातुःश्रींनीं

सबंध श्लोक आणि ‘ जय जय रघुवीर समर्थ ’ हा श्रीरामाचा जयजयकार ऐकला, पण कल्पना झाली नाहीं कीं, आपला म्हणजे नारायण आला असेल ! कोठून होईल ? त्या माउलीनें किती वर्षें वाट पाहिली असेल ? आशा हि उरली नव्हती. उलट त्या सुनबाईंना—श्रेष्ठांच्या कुटुम्बाला—म्हणाल्या, बाहेर कोणी गोसावी आले आहेत, त्यांना भिक्षा नेऊन घाला. कोणी गोसावी आले आहेत, भिक्षा नेऊन घाला, हे ऐकतां च बाहेरून श्रीसमर्थ म्हणतात, हा गोसावी भिक्षा घेऊन जाणारा नाहीं. ‘ हा गोसावी भिक्षा घेऊन जाणारा नाहीं—’ सबंध श्लोक ऐकला तरी कल्पना झाली नाहीं, पण ‘ हा गोसावी भिक्षा घेऊन जाणारा नाहीं ’ हे शब्द ऐकतांच मात्र आशेनें मातुःश्रीचें हृदय दाटून येऊन त्या लगबगीनें म्हणाल्या, ‘ कोण माझा नारायण आला कीं काय ? ’ हे शब्द मातुःश्री उच्चारताहेत तों च नारायणानें जाऊन त्यांच्या चरणावर मस्तक ठेवलें ! त्या वेळीं कोण आनंद झाला असेल ! त्या आनंदाची कल्पना आयांना च होऊं शकेल किंवा कांहींशी मातृभक्त पुत्रांना होऊं शकेल ! आईचे रडून रडून डोळे गेलेले—आपण जागे तरी आहोंत कां स्वप्नांत आहोंत, असा त्यांना भ्रम पडला—त्यांनीं नारायणाच्या मस्तकावर हात ठेवला, त्यास चाचपून पाहिले, चोवीस वर्षांपूर्वीं हातचा निसटला त्या वेळचें स्वरूप कोणीकडे आणि आतांचें कोणी-कडे, त्या जटा आणि ती दाढी, तो एक एक दंड आणि त्या पोटऱ्या हाताला लागून आई म्हणाली, नारायणा, तुझें हें रूप पाहण्याला मला डोळे उरले नाहींत ! असें सांगतात—आणि इसवी सन १९३१ तील वाचकांनो, तुम्ही वाटल्यास इतर गोष्टी मानूं नका, पण एवढी गोष्ट खरी माना, कारण या प्रसंगावर श्रीसमर्थांनीं च एक पद केलेलें आहे—असें सांगतात कीं, श्रीसमर्थांनीं आईच्या मुखावरून हात फिरविला, तावत् श्रीसमर्थांचें नखशिखान्त भव्य स्वरूप मातुःश्रीस दृग्गोचर झालें आणि त्या म्हणाल्या, नारायणा, अरे ही भूतचेष्टा कोठून शिकून आलास ? श्रीसमर्थांचें जें पद आहे, त्याचें शेवटचें कडवें असें आहे,

आई, हीं भूतचेष्टा वगैरे कांहीं नाहीं, सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत वास करणारा जो परमेश्वर, त्याची ही कृपा होय!

सर्वां भूतांचें हृदय। नाम त्याचें रामराय।
रामदास नित्य गाय। तें चि भूत गे माय॥

अशा रीतीनें कांहीं दिवस जांबेस आईजवळ राहून, आरंभीं जरी त्यांनीं तिला कष्टविलें होते तरी अखेरीस प्रथम जन्मदात्या मातेचा उद्धार करून भूमातेच्या उद्धारार्थ श्रीसमर्थ कृष्णातटाकाला गेले! पोटीं पुत्र असे जन्मास यावे, कीं ज्यांनीं आईबापांचा हि उद्धार करावा! धन्य ती कूस जी श्रीसमर्थांना प्रसवली! असो. आपणांस आज इतकेंच पहावयाचें आहे कीं,

हें च तें ठिकाण,

जेथें श्रीसमर्थांनीं अशा प्रकारें आईला दिव्य दृष्टि देऊन कृतार्थ केलें. जेथें श्रीसमर्थांचा देह धरणीला प्रथम लागला, जेथें एकांतांत बसून विश्वाच्या कल्याणाची त्यांनीं चिंता वाहिली, ज्या ठिकाणीं कपिल महामुनीप्रमाणें श्रीसमर्थांनीं मातुःश्रीला कृतार्थ केलें, अशा या

त्रिभुवनांतील पवित्रांतील पवित्र ठिकाणीं

श्रीसमर्थांचें मंदिर असावें व त्यांत श्रीसमर्थांच्या सगुण मूर्तीची स्थापना व्हावी, कीं जिच्या दर्शनानें कोट्यवधी जीवांनीं आपला उद्धार करून घ्यावा, असें जर एकाद्यानें मनांत आणलें, तर ती काय फार मोठी चूक झाली, असें म्हणतां येईल? केव्हां तरी विचार सुचला आणि अगदीं अलिकडे, त्या विचाराला पोषक असे, श्रीसमर्थांचे पहिले शिष्य, टांकळी व इंदुरबोधन मठांचे अधिपति उद्धवस्वामी, यांचे दोन श्लोक आढळले. त्यांनीं ते श्लोक श्रीसमर्थ वैकुंठधामास गेल्यावर समाधिस्थानाविषयीं लिहिले. समाधिस्थानाची महाराष्ट्राला, एरव्हीं विस्मृति पडेल कीं काय, अशी त्यांना त्या वेळीं चिंता पडली, मग तीनशें वर्षांनंतर जन्मस्थानाविषयीं एका-



ह्याचा जीव कळवळला, तर त्यांत काय आश्चर्य आहे? आणि महाराष्ट्रांचा असा घोटाळा होत चालला च होता. चांगल्या चांगल्या विद्वानांनीं कोणी जांबगांव नाशिक जिल्ह्यांत आहे म्हणावें, तर कोणी सातारा जिल्ह्यांत आहे म्हणावें! समाधिस्थळाविषयीं त्या काळीं उद्धवांच्या मनांत जें आलें ती च भावना तीनशें वर्षांनी जन्मस्थानाविषयीं महाराष्ट्राच्या मनांत उद्भूत झाली.

समर्थांस्थळीं पूर्ण देवाल्य व्हावें।
भिमाचे प्रतिष्ठेसि तेथें वडावें।
वडंबा बहु भक्तिचा थोर व्हावा।
जनालागि आधार कांहीं असावा॥

आणि आज जांबेस तरी जी श्रीसमर्थांची स्थापना झाली, ती रामदासस्वरूपी मारुतीची च होय. आज या लहानशा गांवीं बाहेरचे हजारों लोक येऊन श्रीसमर्थभक्तीचा जो प्रचंड आणि नानाविध गजर करीत आहेत, तो पाहून वरील श्लोकांत प्रकट केलेली उद्धवस्वामींची इच्छा सफल झाली, असें म्हणतां येईल. आजचा हा जांबेचा उत्साह पाहून श्रीसमर्थांचे उद्धवकल्याणशिवरायादि असंख्य शिष्य महाराष्ट्रास आशीर्वाद दिल्यावांचून राहणार नाहींत, असें वाटतें.

चाफळास श्रीसमर्थस्थापित प्रत्यक्ष राम आहेत, सज्जनगडावर तर ते स्वतः च अखंड विश्रांति घेण्यासाठीं राहिले आहेत, जांबेस मात्र त्यांच्या जन्मस्थानीं, त्या जागेचें स्मारक म्हणून

## श्रीसमर्थमंदिर

असावयास पाहिजे होतें व तसें घडून आलेलें आज आपण सर्व जण पहात आहोंत. एरव्हीं पुढें मागें हें स्थान कसें कळलें असतें? प्रत्यक्ष समाधिस्थळाविषयीं त्यावेळीं उद्धवांना चिंता वाटली, तर आज त्याच्या शतपट चिंता जन्मस्थानाविषयीं आपणांस वाटली पाहिजे. प्रभु रामचंद्राच्या चरित्रांत त्यांच्याशीं संबंध आलेलीं स्थळें जशीं त्यांच्या काळीं

गाजलीं आणि पुढें तीर्थक्षेत्रें बनलीं, तद्वत् श्रीसमर्थांच्या या जन्मस्थानाचें महाराष्ट्रास अखंड स्मरण रहावें, म्हणून या जागीं श्रीसमर्थमंदिराची आवश्यकता होती.

प्रभु राहिला पाहिला जेथजेथें ।
स्थळें गाजलीं थोर तीर्थें च तेथें ।
तसें हें कळायासि पुढें असावें ।
नसे तेधवां स्थान कैसें कळावें ॥

तथापि, आज साक्षात् त्या जागीं मंदिर होऊन त्यांत श्रीसमर्थ सिंहासनाधिष्ठित झाले आहेत, तेव्हां या ठिकाणीं मंदिर कां असावें, याचें याहून जास्त समर्थन करीत बसण्याचें कारण उरलें नाहीं.

या जागीं मंदिर हवें, पण तें व्हावें कसें ? कल्पना करणें जितकें सोपें होतें, तितकें ती अमलांत आणणें कठीण होतें. कोणी गैरसमजूत करून घेणार नाहींत तर, गेल्या सात आठ वर्षांत श्रीसमर्थमंदिराच्या बाबतींत

## पदोपदीं जो अनुभव आला,

तो आरंभीं च एकदांचा सांगून टाकतो. ध्यानीं मनीं नसतां अनेक गोष्टी अशा जुळून याव्या, कीं चित्ताला चमत्कार वाटावा ! सारे प्रसंग सांगत नाहीं, किंवा सांगतां हि येणार नाहींत, पण पांच पन्नास प्रसंग असे घडले कीं, तेणें करून हृदय भरून यावें आणि वाटावें कीं, देवा, या

## कार्याच्या पाठीमागें चालक शक्ति

कोणी निराळी आहे काय ? असें सहसा लिहूं किंवा बोलूं नये, अशी श्रेष्ठांची शिकवण आहे, पण हें वृत्त लिहितांना मी असें ठरविलें कीं, हातांत टांक धरून मन मोकळें आणि हात ढिला सोडावयाचा व अशा स्थितींत जें भरकटलें जाईल तें जाईल ! क्षमा करणारे समर्थ समर्थ आहेत. कार्यांत विघ्नें आलीं नाहींत, असें नव्हे; फार काय शेवटपर्यंत तीं येत होतीं, पण तीं येत तशीं जात. केव्हां केव्हां तर विघ्नें यावींत आणि जावींत आणि मग ठाऊक पडावें कीं, अशीं विघ्नें

आलीं होतीं, आणि तीं अशा रीतीनें विलयास गेलीं. अशा वेळीं मला

## कचेश्वरांच्या ओव्यांची आठवण

व्हावी. त्या ओव्या वैशाख शु. २ सह ३ शके १८३१ पासून माझ्या अगदीं जवळ आहेत. त्या मला केव्हां तरी एकदां माझ्या मित्रांना आणि श्रीरामदासीच्या वाचकांना सादर करावयाच्या च आहेत. तेव्हां काळ, वेळ, प्रसंग, युक्तायुक्तता वगैरे कांहीं पाहण्याच्या भानगडींत न पडतां या क्षणीं त्या ओव्यांनीं दाटलेलें हृदय हलकें करून एकदम वृत्तान्त पुढें चालविण्यास मोकळा होतों.

॥ श्रीरामसमर्थ ॥

जो जो हेत माझ्या । मनामध्यें येतो ।
तो तो पुरवितो । स्वामी माझा ॥ ८८
कोठें हि अंतर । पडों नेदी कांहीं ।
संसाराची नाहीं । मज चिंता ॥ ८९
माझा अंगीकार । पूर्ण देवें केला ।
अनुभव आला । अंतरासी ॥ ९०
मागें पुढें देव । मज सांभाळितो ।
बाळातें पाळितो । माय बाप ॥ ९१
आतां वणवण । करूं कशासाठीं ।
हृदयसंपुष्टीं । आला देव ॥ ९२
माझा योगक्षेम । चालवितो देव ।
त्यासी अहंभाव । पूर्ण माझा ॥ ९३
त्याणें उणें कांहीं । केलें नाहीं मज ।
इच्छिलें सहज । पावतों मी ॥ ९४
स्नानसंध्या माझी । नित्य चालवितो ।
कथा करवितो । अहोरात्रीं ॥ ९५
जाऊं नेदी कोठें । आपुल्या वेगळें ।
न धरी निराळें । बाळकासी ॥ ९६
संकटाचा कांहीं । येवों नेदी वारा ।
वारितो पर्भारा । स्वामी माझा ॥ ९७
होणारासारिखी । करितो सूचना ।
सादवितो दीना । होईं जागा ॥ ९८

किती उपकार । आठवूं स्वामीचे ।
सर्व खेळ याचे । अगणित ॥ ९९
अनंत ब्रह्मांडें । व्यापूनि भरला ।
पुरोनी उरला । निराळा चि ॥ १००
इच्छेविना काडी । पान हि न चाले ।
जग चाले बोले । सत्ता त्याची ॥ १०१
हानि मृत्य लाभ । उत्पत्ति प्रळय ।
स्थिति समुदाय । कर्त्ता तो चि ॥ १०२
याचा पार वर्णी । ऐसा आहे कोण ।
शेषा हि संपूर्ण । वर्णवेना ॥ १०३
वेद नेति नेति । स्तवितां शिणले ।
तटस्थ राहिले । अधोमुखें ॥ १०४
ब्रह्मादिक अंत । पाहतां भागले ।
साधक शिणले । ठाईं ठाईं ॥ १०५
तो चि कृपा करी । जरी दीनावरी ।
भुक्ति मुक्ति चारी । दासी होती ॥ १०६
वर्म आहे थोडें । स्वामीचें आईका ।
भक्तिभावें एका । वश्य होतो ॥ १०७
कलयुगामाजी । वर्णाश्रमधर्म ।
करूनि सत्कर्म । आचरावें ॥ १०८
ऐसें प्रेरूनिया । कथा करवितो ।
नित्य चालवितो । महाविष्णु ॥ १०९
पुढील प्रसंग । जाणे नारायण ।
अवस्थेचा प्रश्न । ऐसा आहे ॥ ११०
पृच्छेचें उत्तर । वदवितो देव ।
बोले अनुभव । कचेश्वर ॥ १११

या जागीं श्रीसमर्थांचें स्मारकमंदिर पाहिजे, पण तें घडावें कसें, याची विवंचना सुरू झाली. कै. बापुसाहेब महाराजांनीं जागा हवालीं केली, पण जांबगांव पडलें निजामसरकारच्या हद्दींत. निजामच्या राज्यांत कोठें हि मंदिर वा मशिद बांधावयाची झाली, तर त्यास खुद्द

हिज एक्झॉल्टेड हायनेस यांची परवानगी

लागते. ती मिळावी कशी ? जांबगांवचें वैशिष्टय लक्ष्यांत न

घेतां कोणी म्हणावें, इतक्या अडचणींत जांबेस च मंदिर कां बांधता, पुण्यास कां नाहीं बांधीत, धुळयास कां होईना. श्रीसमर्थमंदिर कोठें बांधावयाचें हा काय आपल्या मर्जीचा प्रश्न होता ? १९३२ तील दुर्बलांचा विचार न करतां सज्जनगडावर त्यांनीं समाधि घेतली व समाधीचें दर्शन घ्यावयाचें तर जसें गड चढून गेलें पाहिजे, तद्वत् त्यांनीं जन्म जांबेस घेतला, म्हणून त्या जागेचें स्मारक करावयाचें तर तें, सर्व अडचणी सोसून, त्या च गांवीं, त्या च जागीं केलें पाहिजे. परवानगी लागते तर ती मिळविली पाहिजे. पूर्व परिचय नव्हता, पण या च सुमारास हैद्राबादचे श्रीमंत वामन नाईक साहेब सहकुटुंब मोटारीनें काश्मीरच्या प्रवासास निघाले होते व वाटेंत त्यांचा एक मुक्काम धुळयास पडला होता. मजकडेच उतरण्यास येण्याची त्यांनीं कृपा केली होती. नाईकसाहेबांच्या दानशूरत्वाचा व धर्माभिमानाचा लौकिक ऐकून होतों, पण पूर्वीं प्रत्यक्ष भेट झालेली नव्हती. त्यांच्या जवळ मंदिराची गोष्ट काढली आणि परवानगी मिळवून देण्याचें काम त्यांनीं मनावर घेतलें. जांबगांव औरंगाबाद जिल्ह्यांत आहे व त्या वेळीं डॉ. अनसारी यांचे बंधु औरंगाबाद जिल्ह्याचे तालुकदार ( कलेक्टर ) होते. ते च हल्लीं त्या भागाचे सरसुभे ( कमिशनर ) आहेत. कै. दिगंबरदास यांनीं माझें वकीलपत्र घेऊन त्यांचे कडे परवानगीचा अर्ज दिला. सज्जनगडीं समाधि असतां जन्मस्थानीं मंदिर कशास पाहिजे, इंग्रजी मुलखांतला मनुष्य परवानगी कां मागतो, इत्यादि शंका निघाल्या. जन्मस्थानीं मंदिर असण्याला श्रीमत् शंकराचार्यांचा दाखला आहे, अर्जदाराच्या खात्यावर निजामच्या राज्यांत दौलताबादेजवळ शंकरपुरवाडी येथें जमीन आहे, तेव्हां तो निजाम सरकारचा हि प्रजाजन आहे, इत्यादि समाधानकारक उत्तरें दिलीं गेल्यामुळें परवानगी द्यावी, अशी शिफारस करून कलेक्टरसाहेबांनीं प्रकरण वर रवाना केलें व ' परवानगी देण्यांत आली ' असें मला तारेनें कळविलें. ती बातमी मी मोठ्या आनंदानें तत्काळ आषाढ शुद्ध १३ शके १८४७ ( ४-७-१९२५ ) च्या रामदासी मासिकाच्या अंकांत

जाहिर केली. पण पुढें असें कळलें कीं, परवानगी द्यावी अशी नुसती शिफारस होऊन प्रकरण वर गेलें आहे, अजून परवानगीचा शेवटचा हुकुम व्हावयाचा आहे. शिफारस करतांना कलेक्टरसाहेबांनीं वर असें हि कळविलें होतें म्हणून कळतें कीं, 'परवानगी मागणारे मुंबईच्या कायदे कौंसिलांतील सभासद आहेत, तेव्हां परवानगीचा शेवटचा हुकुम जितका लवकर होईल तितकें बरें.'

परवानगी मिळण्यापूर्वीं च आम्ही घर पाडून जागा साफ करून ठेवली होती. तिचा गांवांतील अजाण लोक, त्यांतल्या त्यांत लहान मुलें दुरुपयोग करीत म्हणून कागाळ्या कानीं येऊं लागल्या. तेव्हां एका वर्षीं आधीं ठरवून श्री. चौंडे महाराज सशिष्य जांब पाहण्यास आले असतां आम्ही सर्वांनीं मिळून ती जागा झाडून काढली, तीवर दाट सडा घातला व रात्रीं त्या जागीं भजन, प्रवचनें वगैरे केलीं. तरी पण पुन्हां कालांतरानें लहान मुलांनीं आपला स्वभाव सोडला नाहीं च. निरुपायानें अशा उपेक्षेंत कांहीं वर्षें गेलीं.

परवानगीचा शेवटचा हुकुम होण्यास आणखी दोन वर्षांवर काळ लागला. कै. दिगंबरदास वकील यांचे कडून, परवानगी मिळाल्याचें पत्र १८४९ मार्गशीर्ष शु. १ (ता. २५।११।१९२७) रोजीं मिळालें. परवानगी मिळाली नव्हती तोंपर्यंत परवानगीचें मोठें कोडें पडलें होतें. पण परवानगी मिळाल्यावर परवानगी मिळविणें सोपें, नंतरची

## साधनांची जुळवाजुळव

करणें च जास्त अवघड होय, असें वाटूं लागलें. जांबेस बांधकामाच्या देखरेखीसाठीं जबाबदार मनुष्य कोण राहील, तज्ज्ञ मनुष्य कोण मिळेल, कारागीर कोठून येतील, सामान कोठें मिळेल, इत्यादि अडचणींचे शंभर प्रश्न मनांत आले. मला स्वतःला यांतील लवमात्र ज्ञान नाहीं. मी मूढ बनलों. अशा वेळीं माझें

नेहमीचें आधारस्थान म्हणजे

## आप्पासाहेब रणदिवे

होत. त्यांच्यावर कार्याचा सारा भार टाकला. माझ्याकडून स्तुतीचा शब्द ऐकण्याची आप्पासाहेबांना जरुरी नाहीं, किंबहुना असला शब्द त्यांना सहन हि होणार नाहीं. पण मी या ठिकाणीं हा जो सारा वृत्तान्त लिहून ठेवीत आहे, तो त्यांच्यासाठीं नसून सर्वस्वीं मजसाठीं व श्रीरामदासी मासिकाच्या थोड्या वाचकांसाठीं होय. सर्वथैव निःस्वार्थपणें, निस्पृहपणें आणि निमूटपणें मित्रसेवा, जनसेवा, राष्ट्रसेवा, श्रीसमर्थसेवा करण्याची आप्पासाहेबांची वृत्ति अलौकिक होय. हें त्यांचे सारे मित्र कबूल करतील. माझ्या ठिकाणीं इतर कोणास दुखविण्याचा हेतु या प्रसंगीं संभवत नाहीं, आप्पासाहेबांच्या उदाहरणावरून इतरांनीं शक्य तर बोध च घ्यावा म्हणून मी निःशंकपणें असें म्हणूं शकतों कीं, गेल्या चाळीस वर्षांच्या तुटपुंजा सार्वजनिक आयुष्यांत मी हजारों स्वयंसेवक पाहिले, पण आप्पासाहेबांसारखा निखालस निरपेक्षपणें सेवा करणारा स्वयंसेवक मी दुसरा पाहिला नाहीं. आप्पासाहेबांची ओळख होण्याला त्यांच्या विषयीं इतकी माहिती मासिकाच्या वाचकांना पुरे होईल. माझ्या हातून आजपर्यंत जें थोडें रामदासी कार्य झालें तें, आप्पासाहेबा सारखा मित्र न मिळतां तर होण्याचा संभव नव्हता. रामदासी कार्याला आरंभ करतांना, मी त्यांच्या बद्दल केव्हां हि स्तुतीचा शब्द लिहूं किंवा उच्चारूं नये, असा त्यांचा आणि माझा करार झाला होता. तो करार दोन वर्षांपूर्वीपर्यंत मी प्रामाणिकपणें पाळला, असें मला वाटतें. कराराची माहिती नसलेल्या कित्येकांनीं या माझ्या वर्तनावरून आपला मजविषयीं विपरीत ग्रह करून घेतल्याचें हि मला कळालें होतें. तरी मी झालेला करार मोडला नाहीं. पण आतां शेवटीं शेवटीं तो करार पाळणें असह्य वाटूं लागल्यामुळें मी आज तो करार बाजूस सारून श्रीसमर्थमंदिराचें शिखर माझ्या दृष्टीस पाडण्याचें सारें श्रेय कोणास

आहे, तें एकवार सांगून टाकून किंचित् ऋणमुक्त होत आहे. मी फक्त दौरे काढून

समर्था मी तूझा तुजविण मला कोण पाहातां ।
सदा सांभाळावें जवळि च जिवामाजि राहातां ।
सुखानंदें छंदें तव गुणकथा गात वदनीं ।
विवेकाचे वाटें अघटित घडे मार्ग सदनीं ॥

अशा रीतीनें श्रीसमर्थांची प्रार्थना करीत व गुणानुवाद गात मंदिरासाठीं भिक्षा मागितली व जरूर तो निधी मिळविला, पण मंदिराच्या उभारणीचीं लहानमोठीं, किचकट, ज्ञानाचीं, नाजुक, जबाबदारीचीं सारीं कामें आप्पासाहेबांनीं पार पाडलीं.

## जांबगांव

हें अगदीं लहान खेडेगांव आहे, हें आपण पाहिलें च आहे. एकादा खिळा लागला तरी तो या गांवीं वेळेवर मिळेल, अशी खात्री नव्हती. अशा ठिकाणीं मंदिर बांधावयाचें होतें. त्यामुळें परवानगी मिळाल्यानंतर प्राथमिक तयारी होण्याला किती दगदग पडली असेल, याची कल्पना करावी. सर्व च तयारी करावयाची होती. चुन्याच्या भट्ट्या आणि विटांच्या भट्ट्या, यांचे प्रयोग करावे लागले. दगडाच्या खाणीचा शोध काढावा लागला. बैल खरेदी करावे लागले, गाड्या ठेवाव्या लागल्या. अशा आणखी पन्नास गोष्टी कराव्या लागल्या. ही सारी तयारी आप्पासाहेबांना करावी लागली. या पूर्व तयारीसाठीं परतुड, जालना, औरंगाबाद, धुळें, जांब येथें त्यांना किती खेपा कराव्या लागल्या असतील त्या त्यांच्या त्यांना माहीत. कामावरचे कारागीर सारे धुळयाहून न्यावे लागले. तात्पर्य, हें च मंदिर एकाद्या मोठ्या गांवीं बांधावयाचें असतें तर इतकी दगदग पडली नसती.

विद्यार्थीदशेपासूनचे आमचे स्नेही भुसावळचे वकील श्री. गोपाळराव गोगटे यांचे वडील चिरंजीव रा. वासुदेवराव गोगटे हे या सुमारास पुण्याच्या टिळकमहाविद्यालयाचे स्थापत्य-

विशारद होऊन दोन तीन वर्षें झालीं होतीं. त्या अवधींत पुण्याकडे च त्यांनीं आपल्या विद्यालयांतील एका शिक्षकाच्या हाताखालीं कांहीं मक्ते घेऊन कामाचा थोडा अनुभव मिळविला होता. त्यांनीं या मंदिराच्या कामावर येण्याचें कबूल केल्यामुळें आमचा एक मोठा प्रश्न सुटला. कामावर त्यांची नेमणूक करण्यांत आली.

या पूर्व तयारींत आणि योजनेंत एक वर्ष गेलें आणि लोकमान्यपंचांगाप्रमाणें

## १८५० पौष शुद्ध १५

या सुमुहूर्तावर श्रीश्रेष्ठांचे वंशज चाफळसंस्थानाधिपति श्रीमंत आबासाहेब महाराज यांच्या हस्तें मंदिराचा पाया खोदण्याचा समारंभ झाला. समारंभास गांवची पाटील कुळकर्णी वगैरे सर्व मंडळी व महाराजांचे कारभारी श्री. बाबुराव देशपांडे हजर होते. श्री. चौंडे महाराज व त्यांची दहावीस शिष्यमंडळी, श्रीसमर्थगाथ्याचे संपादक श्री. अनंतदास, कल्याणचे गोसेवक दादा गोखले, श्रीगोवर्धनसंस्थेच्या कीर्तनकार प्रचारिका श्री. रंगुताई लिंबकर, श्री. सुंदराताई सोहनी, श्री. वेणुताई बापये वगैरे बाहेरची मंडळी समारंभासाठीं मुद्दाम आली होती. श्री. विनायक महाराज मसूरकर, श्री. समर्थदास महाराज, श्री. बाळाजी महाराज, वगैरे श्रीसांप्रदायिकांचीं आशीर्वादपत्रें आलीं होतीं. तीन चार दिवस तेथें राहून सर्वांनीं स्वतः पाया खोदण्याचें काम यथाशक्ति केलें. पाया चवदा फुट खोल घेण्यांत आला आहे. मधून मधून मुरुमाचे जसजसे निरनिराळे थर लागत चालले तसतसा त्याचा नमुना धुळयास आणून तज्ज्ञांचा अभिप्राय घेण्यांत यावा व त्यांचा सल्ला मिळाला तेव्हां च पाया भरण्याच्या कामास सुरवात करण्यांत आली. चवदा फुट खोलीच्या पायाचा प्रत्येक थर आतां बुजला, पण तो माझ्या डोळयापुढें आहे. चवदा फुट खोल पाया गेल्यावर एके दिवशीं तळाशीं जाऊन बसलों असतां, दरबारच्या प्रसंगीं सांगितल्याप्रमाणें,

मनांत आलें कीं, आपण बसल्या जागीं असतां च, आप्पासाहेब आणि वासुदेवराव वर पाया भरतील आणि वर श्रीसमर्थांच्या मूर्तीची स्थापना करतील, तर ते केवढे उपकार होतील! पण एवढें भाग्य आहे कोणाचें! कळस पाहण्यासाठीं आपण बाहेर राहून च पाया भरला गेला आणि दगडाच्या कामास सुरवात झाली. मधून मधून दगड खुंटत तेव्हां काम मंदावे. पावसाळ्यांत काम कमी व्हावें. याप्रमाणें कधीं मंदगतीनें तर कधीं त्वरित काम चाले.

एकादें घर बांधणें वेगळें आणि मंदिर बांधणें वेगळें. मंदिराचें काम अवघड असलें पाहिजे व त्यास अनुभवाची जरुरी जास्त लागत असली पाहिजे. मला तर सारखी काळजी वाटे, पण आप्पासाहेब व वासुदेवराव यांच्या हि मनांत मुळीं च शंका डोकावत नसेल, असें मला वाटत नाहीं. दगडाचें काम वर येत चाललें, तसतशी जबाबदारी जास्त भासूं लागली. अशा वेळीं

## एक अकल्पित गोष्ट

घडून आली. या सुमारास एक गृहस्थ अकल्पित रीतीनें धुळ्यास येऊन भेटले. त्यांचे नांव धोंडु मिस्त्री. कामगारांच्या फोटोंत पागोटें घातलेले, मांडीवर मुलाला घेऊन बसलेले वृद्ध गृहस्थ, ते धोंडु मिस्त्री होत. त्यांच्या डाव्या बाजूचे काळी टोपी घातलेले रा. वासुदेवराव गोगटे, स्थापत्यविशारद होत. रा. धोंडु मिस्त्री शिकलेले मुळीं च नाहींत. कोणत्या हि इंजिनिअरिंग कॉलेजांत किंवा महाविद्यालयांत राहून त्यांनीं शिक्षण घेतलेलें नाहीं. विश्व हें च त्यांचें विद्यालय आणि प्रत्यक्ष काम करणें आणि अनुभव मिळविणें हें च त्यांचें कॉलेज होय. त्यांच्या चरित्रावरून असें दिसतें कीं, मागील जन्माचे संस्कार घेऊन ते या जन्माला आले असावेत. त्यांना मंदिरें पाहण्याचा फार नाद. तेवढ्यासाठीं त्यांनीं साऱ्या हिंदुस्थानभर प्रवास केला आहे. कोणाच्या हि मंदिरापाशीं गेल्यावर ते मंदिराकडे सारखे पहात रहातात व जणूं



स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे, रा. शंकरराव जोग, कामगार मंडळी व त्यांच्या कुटुम्बांतील मुलेंबाळें

सारें मंदिर डोळ्यांत सांठवून घेतात. मी त्यांना विचारलें नाहीं, पण माझ्या मनांत आलें कीं, त्यांनीं इतकीं मंदिरें पाहिलीं, पण मंदिरें पाहण्याच्या नादांत आंत जाऊन देवदर्शन घेण्याचें त्यांना बहुधा भान रहात नसावें. त्यांच्या हातून पांच सात नामांकित मंदिरांचीं कामें झालीं आहेत. खानदेशांतील एरंडोलजवळचें पद्मालयाचें देवालय यांनीं च बांधलेलें आहे. ते धोंडु मिस्त्री एके दिवशीं अचानक धुळ्यास येऊन भेटले. तुम्हांस कोणी पाठविलें म्हणून त्यांस विचारिलें. कोण पाठविणार, मंदिराची वार्ता ऐकून आलों, असें ते म्हणाले. कोणी न पाठवो, पण या वेळीं त्यांचें येणें आमच्या फार उपयोगीं पडलें. रा. धोंडू मिस्त्री यांची जांबेस रवानगी करण्यांत आली. मंदिराचें घुमटापासून वरील सर्व काम त्यांच्या नजरेखालीं झालेलें आहे. आणि आमचे आप्पासाहेब रणदिवे यांनीं तरी वास्तुशास्त्राचें ज्ञान कोणत्या कॉलेजांत जाऊन मिळविलें आहे ? तीस वर्षें संगतींत असून हि आप्पासाहेबांमध्यें हा गुण असल्याचें माझ्या निदर्शनास आलेलें नव्हतें. आप्पासाहेब, वासुदेवराव आणि धोंडु मिस्त्री यांनीं हें मंदिर बांधलें आणि शेवटीं शेवटीं कामें लवकर उरकावीं म्हणून, वासुदेवरावांच्या डाव्या बाजूस बसलेले रा. शंकरराव जोग यांना जांबेस पाठवावे लागले आणि राक्षसासारखें काम करण्याची त्यांची तऱ्हा उपयोगी पडून चैत्र शु. ९ पर्यंत बरीचशीं कामें उरकलीं.

सर्व च कामगार मंडळींनीं जिवापाड मेहनत केली. मला त्या सर्वांची ओळख आहे, असें वाटत नाहीं. वासुदेवराव आणि शंकरराव यांच्या पाठीमागें मध्यभागीं उभे असलेले रा. खंडोबा यांनीं आरंभापासून शेवटपर्यंत रा. वासुदेवराव गोगटे यांच्या हाताखालीं अत्यन्त निष्ठेनें आणि प्रामाणिकपणानें काम केलें. रामजी, पुंजाजी, लिंबाजी, दशरथ, गणपत, इत्यादि कारागिरांचीं नांवें व गणोबा, अश्रोबा, सूर्यभान इत्यादि गड्यांचीं नांवें वारंवार ऐकत असे, पण फोटोंत नक्की, कोणता कोण, हें मला दाखवितां येत नाहीं. अगदीं

वरची जी रांग आहे, तींत डाव्या बाजूला जो उभा आहे, तो बहुधा सूर्यभान. हा लक्षांत अशामुळें राहिला कीं, प्रतिपदेला सोन्याचा कळस चढविल्यानंतर एक दोन दिवसांनीं पराची सोडावयाची होती, तर ही स्वारी भर दुपारीं एक वाजतां शिखराजवळच्या हातभर रुंदीच्या पाळखावर उताणी पडून गाढ झोपीं गेली होती. खालून हांक मारण्याची हि पंचायत वाटली. अशा निर्भयवृत्तीच्या या सर्व माणसांनीं श्रीसमर्थांची नोकरी केली म्हणून आज आपल्या दृष्टीस मंदिराचें शिखर पडत आहे.

१८५० च्या पौषांत श्रीसमर्थमंदिराला सुरवात झाली तरी

## श्रीसमर्थांची मूर्ति

कोठें, कोणाकडून करवावयाची, हें १८५१ च्या पौषापर्यंत निश्चित झालें नव्हतें. श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी, औंध, यांच्या शिवाय मला दुसऱ्या कोणाची कल्पना नव्हती. त्यांना विनंति केल्यावरून आपल्या देखरेखीखालीं आपल्या कारागिराकडून मूर्ति तयार करवून देण्याचें त्यांनीं कबूल हि केलें होतें. १८५१ च्या पौष व. ११ ला हैद्राबाद येथें प्रवचनानंतर श्रीमंत वामन नाईक साहेब यांच्या तर्फे जाहीर झालें कीं, नाईक साहेब आपल्या खर्चानें मूर्ति तयार करवून देणार. ते कोणाकडून मूर्ति करविणार हें मला कळालें नव्हतें. मी श्रीमंत बाळासाहेबांना कळविलें आणि त्यांच्या कडून उत्तर आलें कीं, नाईक साहेबांनीं हि आपल्याला च मूर्ति तयार करवून देण्याविषयीं लिहिलें आहे. मूर्ति, अर्थात्, मेरुस्वामींनीं ज्या तीन प्रती काढल्या होत्या व त्यांपैकीं जी एक सज्जनगडावर आहे, तिच्या बरहुकुम, शास्त्रीय कलेच्या दृष्ट्या तिच्यांत जे दोष असतील ते वगळून, तयार करावयाची हें ठरलें. श्रीमंत बाळासाहेब यांची कॉलेजपासून ओळख होती, इतकें च नव्हे, तर थोडा ऋणानुबंध हि होता. ते रहात बंगल्यांत, पण त्यांच्या नांवावर कॉलेजांत हि एक खोली असे, त्या खोलींत मी रहात असे. श्रीमंत हे संस्थानिक आहेत हे विसरून

जाऊन, पूर्व ऋणानुबंध समजून मी श्रीमंतांना लिहिलें कीं, श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं व्हावयाच्या श्रीसमर्थमंदिरांत स्थापावयाची श्रीसमर्थांची मूर्ति तयार करण्याचें काम श्रीमंतांच्या वाट्याला यावें, हें मी श्रीमंतांचें मोठें भाग्य समजतो, तेव्हां श्रीमंतांस माझी कळकळीची विनंति आणि परमेश्वरास आतुरतेची प्रार्थना कीं, श्रीमंतांच्या हातून श्रीसमर्थांची मूर्ति इतकी सुंदर, इतकी मनोहर, इतकी निमासुर निर्माण व्हावी कीं, मूर्ति पाहतां च पहाणाराचें चित्त श्रीसमर्थचरणीं लीन होऊन रहावें ! काळजी वाटे म्हणून मी त्यांना वारंवार असें लिहावें व तुम्ही निश्चिंत असा, असें तितक्या वेळां त्यांनीं मला कळवावें. पंडित सातवळेकर यांना हि एक दोन वेळां लिहिलें होतें व त्यांचे कडून हि यत्किंचित् हि चिंता न करण्याविषयीं आश्वासन आलें होतें. श्रीसमर्थांच्या मूर्तीकडे साऱ्या महाराष्ट्राचें लक्ष लागलें होतें. महाराष्ट्राची आतुरता पाहून कारागिराच्या हाताला यश येणें भाग होतें आणि तसें तें आल्याची साक्ष जांबेस आलेल्या प्रत्येकाची पडली. मूर्ति पाहून सर्वांना आनंद झाला. सर्वांच्या मुखांतून धन्योद्गार निघाले. सर्वांचीं मनें प्रसन्न झालीं. कारागीर श्री. पांडुरंग पुंजाजी पाथरवट व त्यांना मदत करणारा त्यांचा मुलगा यांची धन्य होय !

शक्य तर १८५३ ची रामनवमी साधावी, असा विचार होता व १८५२ च्या आरंभाला जीर्णोद्धाराच्या ज्या पत्रिका छापण्यांत आणि वाटण्यांत येत, त्यांत हा विचार जाहीर झाला होता. परंतु जसजसा दिवस जवळ येत चालला तसतसें राहिलेल्या कामाचें अफाट स्वरूप दिसूं लागून १८५३ ची रामनवमी कशी साधेल, अशी चिंता वाटूं लागली. ५३ च्या रामनवमीपर्यंत मूर्ति तयार होणें शक्य नाहीं, असें श्रीमंत बाळासाहेबांनीं कळविल्यामुळें ५३ च्या रामनवमीचा प्रश्न च उरला नाहीं. एकदा एक रामनवमी हुकली कीं, पुढील रामनवमी च पाहिली पाहिजे, कारण श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं श्रीसमर्थमूर्तिस्थापनेला त्यांच्या जन्मतिथीशिवाय दुसरा मुहूर्त नाहीं. १८५३ ची रामनवमी

साधली नाहीं, पण तें हि इष्ट, असें च झालें, म्हणावयाचें. उत्सव-समारंभांत वाशिमचे कोणी ज्योतिषी आले होते, त्यांना पत्रिका करण्याचा नाद फार, त्यांच्या जवळ चार पांच हजार लोकांच्या जन्मकुंडल्या होत्या, त्यांनीं

## श्रीसमर्थमूर्तिस्थापनेची कुंडली




याप्रमाणें मांडून कळविलें कीं, मुहूर्त अपूर्व आहे, इतका उत्कृष्ट मुहूर्त गेल्या दहा वर्षांत तरी नव्हता. आम्हीं मनांत म्हटलें, आम्हांस बरें वाटावें म्हणून जोशीबुवा असें सांगत नसतील तर, रामनवमीशिवाय दुसरें कांहीं न पाहतां ठरविलेला मुहूर्त इतका उत्कृष्ट निघावा, हा हि पूर्वसंकेत च होय. १८९३ च्या चैत्र शु. ९ ला स्थापना होऊं शकली नाहीं च, पण आतां शांतपणा मिळून १८५४ च्या चैत्राच्या आधीं सर्व कामें सहज आटोपतील, अशी कल्पना होती, ती हि चुकली. १८५४ चैत्र शु. १ येऊन ठेपली तरी पुष्कळ च कामें शिल्लक राहिलीं होतीं. चैत्र शु. ६ च्या सायंकाळपर्यंत कामें चालू च होतीं. सप्तमी ते दशमी कामें बंद ठेविलीं होतीं.

## सज्जनगडावर

अष्टमीच्या सभेंत, श्रीसमर्थांच्या प्राणप्रतिष्ठेच्या समारंभाचा साद्यन्त विचार करूं, असें पौषाच्या अंकांत जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें गडावर १८५३ माघ व. ७, ८ स श्री रामदासी मंडळींनीं निरनिराळ्या वेळीं आणि एकत्र जमून समारंभांतील शेंकडो बाबींचा खल केला,

आणि अष्टमीच्या सभेंत एकंदर कार्याचा अहवाल सादर होऊन सर्वांना जांबेस येण्याविषयीं आग्रहपूर्वक आमंत्रण देण्यांत आलें. संप्रदायाचें वैभव जेणें करून वाढेल, अशी कोणती हि योजना निघाली म्हणजे कै. व पु- साहेब महाराज यांचा तिला हटकून पाठिंबा मिळावयाचा, हें जसें ठरलेलें होतें, ती च वडिलांच्या ठिकाणची वृत्ति श्री. आबासाहेब महाराज यांच्या हि ठिकाणीं दिसून येते. जांबेच्या समारंभास आपण अगत्य आले पाहिजे, अशी श्री. आबासाहेबमहाराज यांस विनंति करण्यांत आली व ती त्यांनीं मोठ्या आनंदानें मान्य केली, यांत महाराजांची त्यागवृत्ति च दिसून येत आहे. चाफळसंस्थानाधिपति रामनवमीस चाफळास नसतील, असे प्रसंग, माझ्या समजुतीनें, पूर्वीं क्वचित् च आले असतील. न जाणों, हा च पहिला प्रसंग असेल. असें असतां, चाफळच्या उत्सवाची व्यवस्था अन्य तऱ्हेनें लावून, स्वतः जांबेस येण्याची कृपा करून समारंभाला विशेष शोभा आणली, हे महाराजांचे संप्रदायावर उपकार होत.

मूर्ति तयार झाली होती व ती

## औंधाहून जांबेस

न्यावयाची होती. मोठी जबाबदारी वाटत होती. १८५३ ची माघ व. ९ गडावर करून दुसरे दिवशीं रात्रीं मुक्कामाला उंब्रजेस गेलों. तेथून वद्य ११ (३।३।३२) ला चाफळास गेलों, गांव बाहेर होता, मांड नदीचे स्नान केलें, श्रीरामाचें दर्शन घेतलें, यंदाच्या श्रीरामनवमीस जांबेस श्रीसमर्थमूर्तिस्थापनेच्या समारंभाला यावें, अशी श्रीचरणाची प्रार्थना केली आणि परतलों, तों थेट मसुरास आगगाडी गांठून रहिमतपुरा- वरून त्या च दिवशीं सायंकाळीं औंधास पोंचलों. श्रीमंतांची भेट घेतली. श्रीसमर्थांची मूर्ति पाहिली. चेहऱ्यावरचें हास्य पाहिलें. बोलूं इच्छितात कीं, असें भासलें. इतकी मूर्ति सुंदर झाली आहे, हें तात्पर्य. श्रीमंतांच्या हाताला परमेश्वरानें यश दिलें. या अंकांत एकट्या मूर्तीचा

फोटो दिला आहे, तो तो च. सिंहासन आणि पादुका हीं अजून तयार होत च होतीं. माघ व. १२ ( ता. ४।३।३२ ) रोजीं सकाळीं श्रीमंतांनीं स्वतःच्या देखरेखीखालीं मूर्ति एका मोठ्या पेटींत व्यवस्थित बंदोबस्तानें ठेवून व पेटी बंद करून स्वतःच्या कॉरींत दुपारीं मूर्तीसह पुण्यास आमची रवानगी करून दिली. सायंकाळीं च पुण्यास पोंचून डॉ. गोपाळराव रणदिवे यांचेकडे मूर्तीची पेटी सुरक्षित ठेवण्यांत आली. तेथून पुढें तिचा विमा उतरून आप्पासाहेब रणदिवे यांनीं ती पेटी आगगाडीनें फाल्गुन शु. १२ ला हलविली, ती फाल्गुन शु. १३ ला सकाळीं मनमाडास आणि सायंकाळीं परतुडास सुरक्षित पोंचली. मी इकडून निघून आप्पासाहेबांस मनमाडास मिळालों. जांबेची मंडळी दिंडीसह परतुडास सामोरी आली होती. अशा रीतीनें वाजत गाजत भजन करीत, मार्गांत लागणाऱ्या गांवांतील लोकांचें स्वागत स्वीकारीत मूर्ति जांबेस फाल्गुन शु. १४ ला सुखरूप जाऊन पोंचली. तथापि अजून

## मुख्य मधला कळस
### आणि
## सिंहासन

यांचा ठिकाण नव्हता. तो कळस तयार करवून त्याला सोन्याचा मुलामा देण्याचें काम नाशिकचे रा. पुरुषोत्तम रामचंद्र वैशंपायन यांजकडे सोंपविलें होतें. रा. वैशंपायन हे या कामांतले वाकबगार आहेत. त्यांच्या मनाजोगतें काम होईना म्हणून त्यांना अंदाजाबाहेर वेळ लागला. परंतु पाडवा जवळ येत चालला तसतसा इकडे आमचा जीव कासावीस होत होता, याची त्यांना कल्पना होती किंवा नाहीं, न कळे. दोन महिने कळस येत च होता. वैशंपायन दिवस टळूं देणार नाहींत, अशी आप्पासाहेब खात्री देत होते. त्याप्रमाणें अखेरीस कळस फाल्गुन व. ३० ( ५।४।३२ ) रोजीं जांबेस येऊन पोंचला. कळसाचें काम सुबक झालें आहे. या कळसाला जें चार तोळे सोनें

लागलें आहे त्याचा थोडा इतिहास आहे. या चार तोळ्यांपैकीं तीन तोळे सोनें

## तिघां आर्यांच्या हातांतील वेढ्यांचें

आहे व चवथा तोळा सोनें अखिल महाराष्ट्रीय स्त्रियांच्या वतीनें देण्यांत आलें आहे. म्हणजे मुख्य मधल्या कळसाला जो सोन्याचा मुलामा देण्यांत आला आहे,त्याचें सारें श्रेय महाराष्ट्रीय स्त्रीवर्गाकडे आहे.

कळस आला आणि नंतर सारें लक्ष सिंहासन आणि पादुका येण्याकडे लागलें. सिंहासनाचे तीन डाग आणि पादुकांचा एक डाग मिळून चार डागांचें वजन चवरेचाळीस मण होतें. ते डाग ता. २५ मार्च रोजीं रहिमतपुराहून मालगाडीनें रवाना झाले. ते वेळेवर कसे येऊन पोंचणार, अशी चिंता उत्पन्न झाली. पुणें, दौंड, मनमाड अशीं गाडी बदलण्याचीं तीन ठिकाणें मार्गांत होतीं. या तिन्ही स्टेशनवरील मंडळींनीं मनावर घेतलें नसतें तर डाग वेळेवर येऊन पोंचणें शक्य नव्हतें. या तिन्ही ठिकाणच्या स्टेशनमास्तरांना सिंहासन आणि पादुका यांचे डाग कृपा करून अगत्यपूर्वक तत्काळ पुढें रवाना करावे, अशीं विनंतिपत्रें पाठविलीं व मोठ्या अभिमानाची गोष्ट कीं, या तिन्ही ठिकाणच्या स्टेशनवरील अधिकारी मंडळींनीं, विशेषतः दौंडचे रा. गंगाधरपंत देवस्थळी व मनमाडचे रा. दत्तात्रय वामन जवखेडकर यांनीं प्रसंगाचें महत्त्व जाणून, अत्यन्त तत्परतेनें काळजीपूर्वक चारी डाग पुढें रवाना केले, म्हणून च ते चैत्र शु. १ ( टि. पं. ) ला म्हणजे ता. ७।४।३२ रोजीं सायंकाळीं दिवाबत्तीचे वेळीं जांबेस येऊन पोंचले, त्या च दिवशीं सकाळीं कळस शिखरावर चढविण्यांत आला होता आणि सायंकाळीं सिंहासन हि येऊन पोंचलें. सर्व चिंता दूर झाली. चैत्र शु. २ ला सिंहासन बसविण्याचीं जागा साफ करण्यांत येऊन त्यावर उत्तरेकडील काशी-विश्वेश्वराची माळ, दक्षिणेकडील धनुष्कोटींतील सेतु आणि मध्यभागच्या

खुद चाफळच्या श्रीरामाच्या रथाखालची माती पसरविण्यांत येऊन सिंहासन आपल्या जागीं स्थिर करण्यांत आलें आणि नंतर गाभाऱ्यांतील फरशीच्या कामास सुरवात झाली. सभामंडपांतील फरशीचें काम चालू च होतें. या च सुमारास गाभाऱ्याचा दरवाजा धुळ्याहून रा. सीताराम मिस्त्री स्वतः घेऊन आले. दरवाजा सुंदर झाला आहे. तो बसविण्यांत आला. तात्पर्य, खुद सभामंडप आणि गाभारा यांतील कामें पंचमी, षष्ठीपर्यंत पुरवली.

श्रीरामदासांकित श्रीसमर्थसेवक मंडळीपैकीं कांहीं जण प्रतिपदेच्या पूर्वी सात आठ दिवस आले होते व कांहीं आदल्या दिवशीं आले. तेव्हां असें ठरविण्यांत आलें कीं, प्रतिपादेपासून नवमीपर्यंत श्रीसमर्थमंदिराच्या आवारांत

## कांहीं ग्रन्थांचीं पारायणें

व्हावीं. ग्रन्थ ठरविण्यांत आले व कोणत्या ग्रन्थांचीं कोणी पारायणें करावीं, तें ठरविण्यांत आलें. याशिवाय आणखी कोणाला कोणत्या हि ग्रन्थाचें पारायण करण्यास प्रत्यवाय नव्हता. पारायण करणारांनीं नवमीच्या रात्रीं बारा वाजेपर्यंत आपआपलें वृत्त निवेदन करावें, असें ठरलें. त्याप्रमाणें जीं पारायणें झालीं त्या ग्रन्थांचीं नांवें व पारायणांची संख्या येणें प्रमाणें:

| | |
|---|---|
| श्रीमत् ग्रन्थराज दासबोध ... ... .... | १० पारायणें |
| श्री श्लोक मनाचे .... .... .... | ६५ |
| श्रीसमर्थांची कविता .... .... .... | १ |
| श्री करुणाष्टकें .... .... .... | १ |
| श्री पदपदांतरें .... .... .... | १ |
| श्री आत्मारामादि लघु प्रकरणें .... .... .... | २ |
| श्री श्रेष्ठांची कविता ... .... .... | १ |
| श्री स्वानुभवदिनकर .... .... .... | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| श्री सीतास्वयंवर | .... | .... | .... | | १ |
| श्री दासविश्रामधाम | .... | .... | .... | | १ |
| श्री समर्थप्रताप | .... | .... | .... | | ६ |
| श्री अध्यात्मरामायण | .... | .... | ... | .... | १ |
| श्रीमत् भगवद्गीता | .... | .... | .... | .... | ५ |
| श्रीमत् भागवत | ... | .... | .... | ... | १ |
| श्री विष्णुसहस्त्रनाम | .... | .... | .... | ... | ७ |

याप्रमाणें पंधरा ग्रन्थांचीं पारायणें झालीं व ते सारे ग्रन्थ यापुढें पारायण करण्यासाठीं म्हणून श्रीसमर्थमंदिरांत ठेवण्यांत आले आहेत. या पारायण-ग्रन्थांत विशेष अवघड काम श्रीदासविश्रामधाम या प्रचंड ग्रन्थाचें होतें. त्या ग्रन्थाचें पारायण करण्याची जबाबदारी दोन तीन स्त्रियांनीं आपणांवर घेतली होती व रोज नियमानें शें सवाशें पृष्ठें वाचून त्यांनीं आपली जबाबदारी पार पाडली. याशिवाय आणखी कांहीं पारायणें झालीं, पण तीं निश्चित न कळल्यामुळें वरील संख्येंत त्यांचा समावेश करतां आला नाहीं.

याशिवाय विशेषतः श्री. चौंडेमहाराजांच्या शिष्यगणानें त्या नऊ दिवसांत प्रत्यक्ष जांबेच्या सीमेंत त्रयोदशाक्षरी तारकमंत्राचा १, ३८, ६८, २०० जप केला व पूर्वीं च परगांवीं झालेला ११, ६१, ३१, ७०० जप येथें अर्पण केला. मिळून तारकमंत्राच्या जपाची संख्या तेरा कोटी भरली.

पवित्र तीर्थांचें जल आणि पवित्र ठिकाणची मृत्तिका वगैरे हीं ठिकठिकाणांहून पूर्वींपासून येत होतीं, पण या नऊ दिवसांच्या अवधींत त्यांची गर्दी फार झाली. गर्दीमुळें मी सर्वांचीं नांवें टिपून घेऊं शकलों असें वाटत नाहीं. जें थोडें टिपण झालें तें असें :

## पवित्र तीर्थांचें जल

| तीर्थांचें ठिकाण | पाठविणाराचें किंवा आणून देणाराचें नांव |
|---|---|
| मांडनदी—चाफळ | |

| | |
|---|---|
| प्रयाग येथील त्रिवेणी क्षेत्रांतील श्रीभागीरथीचें जल | डॉ. भास्कर गोविंद घाणेकर, हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस |
| पश्चिम समुद्र व तापी, नर्मदा, चंद्रभागा | कृष्णाजी विठ्ठल महाजन—पंढरपुर |
| तापी .... ... .... | गोपाळराव गोगटे |
| चंद्रभागा .... .... | हरि पंढरीनाथ बहिरट—पंढरपुर |
| गंगाजल—हरिद्वार .... | नारायण विष्णु आठवले—पुणें |
| कृष्णा .... .... | बाबुराव कोटनीस महाराज |
| गंगा—प्रयाग .... .... | गणेश बळवंत तगारे—अष्टे |
| कृष्णा—महाबळेश्वर .... | चौंडे महाराज |
| मांडनदी .... .... | बाळुबाई कुळकर्णी—अष्टे |
| हेमावती—म्हैसूर संस्थान .... | मीनाक्षीबाई तांबे |
| गंगोत्री .... ... | नानासाहेब घारपुरे |
| भागीरथी—प्रयाग .... | जनाबाई व कृष्णाबाई पाठक—चरेगांव |
| सर्व तीर्थें ... .... | दादा गोखले—कल्याण |

## पवित्र ठिकाणची मृत्तिका वगैरे

सेतु—धनुष्कोटी

चाफळच्या श्रीरामाच्या रथाखालील मृत्तिका

कृष्णाकोयनासंगम—कऱ्हाड

| | |
|---|---|
| कोल्हापुर—गजशाला<br>कोल्हापुर—राजद्वार<br>सांगली—राजद्वार<br>कृष्णावारणासंगम—हरिपुर | बाबुराव कोटनीस महाराज |

सेतु–रामेश्वर .... ... गणेश बळवंत तगारे–अष्टे
कऱ्हाड संगम .... .... बाळुबाई कुळकर्णी–अष्टे
माहुलीसंगम
कऱ्हाडसंगम } आण्णाबोवा
औदुंबर–दत्तचरणाजवळील मृत्तिका

पूर्वी व समारंभाचे वेळीं श्रीसमर्थांना चांदीचीं भांडीं वगैरे व इतर कांहीं वस्तु अर्पण करण्यांत आल्या व मंदिराच्या उपयोगासाठीं कांहीं वस्तु मिळाल्या, त्यांची यादी :

## चांदीचीं भांडीं वगैरे

ताम्हन .... श्री. राधाबाई साहेब नाईक-तंजावर

दोन नीरांजनें व एक सुंदर तबक } .... डेन्टिस्ट बेंद्रे-सोलापुर

फुलपात्र .... ... व्यंकोबा नाईक कोरटपल्ली-इंदुरबोधन

तांब्या
पळी
ताट } श्री. उज्जयिनीकर महाराज-इंदुरबोधन
वाट्या
तबकडीसह झारी

उदबत्तीचें घर ... हरि पंढरीनाथ बहिरट-पंढरपुर

चांदीची वाटी
महाळुंगाच्या पाकासह } दत्तात्रय रामचंद्र आठवले, रामाश्रम, सांगली

कमंडलु .... कृष्ण शास्त्री देवधर वैद्य-नाशिक

तांब्या वगैरे भांडीं .... श्रीमंत नानासाहेब धामणगांवकर जहागीरदार

यापेक्षां आतां जास्त चांदीच्या भांड्यांची श्रीसमर्थांना जरुरी नाहीं व तीं

कोणी अर्पण करूं नये. श्रीमंत नानासाहेब धामणगांवकर यांनीं अर्पण केलेल्या भांड्यांची यादी या क्षणीं मजजवळ नसल्यामुळें पूर्ण तपशील देतां आला नाहीं.

## इतर वस्तु

| | |
|---|---|
| श्रीसमर्थांची उत्सवमूर्ति-पितळी प्रभावळ व छत्र चांदीचें यासह<br>पादुका पितळी<br>चांदीची श्रीसमर्थांची मूर्ति-चौकटींत बसविलेली | श्री. बाबुराव कोटनीस महाराज |
| कुबडी, अति प्रेक्षणीय, जीवर मारुती, शेषशायी भगवान्, रामपंचायतन, समर्थ, कल्याण, दत्त, आणि मुरलीधर यांचीं चित्रें कोरलेलीं आहेत.<br>एक सोन्याचें लहान फुल<br>श्रीरामपंचायतन-चंदनाचें-कांचेच्या घरासह | श्री. वामन भटजी बाळेकुंद्रीकर, शहापुर बेळगांव |
| पालखी—सर्व सामान व साज यासह म्हणजे चवऱ्या, छत्री, मोरचेले, दांडी, पिंजरी, गादी, लोड, तक्या, गिरद्या, गोंडे, वगैरे वगैरे यासह | श्री. चौंडे महाराज |
| चांदीचें एक मोठें फूल व दोन लहान फुलें | डॉ. मुरलीधर श्रीनिवास काळे-जालना |
| समई-झांकण व ताटली यासह— नंदादीपासाठीं<br>तेलासाठीं वीस रुपये तूर्त | श्री. दत्तात्रय रामचंद्र गदगकर हस्तें कोटनीस महाराज |
| तोरणमाळ ... .... | गिरगांव-मुंबईकडून टपालानें, कोणाकडून कळलें नाहीं. |

गाळिव्या .... विष्णुपंत कर्वे, अफ्रिका

| | |
|---|---|
| मूर्तीला साजेसें नेसावयाचें वस्त्र व पांघरावयाचें फडें | राधाबाई केतकर, बांधणवाडी ता. कल्याण |

खादीची शाल .... रंगनाथ जोशी—हिंगोली

शुद्ध खादी भगव्या रंगाची .... हरि कृष्ण इंककर, कोल्हापुर

बुक्का आणि उदबत्त्या .... हरि पंढरीनाथ बहिरट पंढरपुर

कुंचला लादी घासण्यास .... गणेश गोपाळ खाडीलकर रामदासी-मिठबाव ता. देवगड

| | |
|---|---|
| कुंचे, उदबत्तीचे पुडे, चंदनाचा खोड, स्वदेशी कापुर, अष्ट गंध | दादा गोखले, कल्याण |

जल व मृत्तिका पाठविणारे किंवा समक्ष जांबेस आणून देणारे, तसें च चांदीचीं भांडीं व इतर वस्तु श्रीसमर्थांना अर्पण करणारे, या सर्वांचे येथें च आभार मानणें इष्ट आहे. बाकी या सर्वांचे आभार मानणारा मी कोण ? सर्व जण भक्तिभावानें श्रीसमर्थांची सेवा करीत आहेत, ती श्रीसमर्थचरणीं रुजु होत असली च पाहिजे. तें च त्या सेवेचें खरें पारितोषिक, आभार नव्हत.

प्रत्यक्ष स्वाहाकार आणि अर्चा यांची तयारी करणें फारसें कठीण नव्हतें, पण समारंभासाठीं जवळपासचे आणि दूरदूरचे जे हजारो

## भक्तजन येणार त्यांची सोय

कशी व्हावी, ही चिंता वाटूं लागली. कांहीं हि केलें तरी लोकांची गैरसोय ही होणार च, अशी भीति वाटे. परतुडपर्यंत येण्याला आगगाडीचे सवलतीचे दर, परतुडपासून पुढें जांबेपर्यंत जाण्याचा मार्ग, जांबेस राहण्याची आणि भोजनाची व्यवस्था, पाण्याचा पुरवठा, दिवाबत्तीची तजवीज, आरोग्याची काळजी अशा सात बाबी मुख्य

होत्या. पैकीं सहा गोष्टींची थोडी फार तरी सोय लावतां आली, प
एका बाबतींत मात्र आम्ही फार च कमी पडलों, याचें दुःख झाले
आणखी थोडी जास्त सवड असती, किंवा थोडें जास्त द्रव्य ख
करण्याचें धैर्य झालें असतें, तर या हि बाबतींत मान खाल
घालण्याचा प्रसंग न येता. निजाम स्टेट रेलवेनें आगगाडीचे सवलती
दर मंजूर केले. त्याचें श्रेय श्री. नाईक साहेब, हैद्राबादचे प्रमु
वकील श्री. पांडुरंगराव वासुदेव जोशी व सदर रेलवेच्या मुख
कमराशियल मॅनेजरचे असिस्टंट श्री. रिंगे या त्रिवर्गास आहे.
सवलतीच्या दराचा फार उपयोग झाला व पुढील वर्षी जं
आय. पी. रेलवेकडे हि खटपट करतां येईल. परतुडपासू
जांबेपर्यंतचा मार्ग आडरस्त्यानें बहुधा शेतजमिनींतून आहे. महारा
सर किसन प्रसाद बहादुर यांनी कृपा केली म्हणून लॉरी येण्यापुर
त्या रस्त्याची तात्पुरती दुरुस्ती झाली; तथापि ती निर्भयता उत्प
करील अशी झालेली नाहीं. लॉरी येण्या जाण्याला रस्ता धोक्याचा
आहे. फार काय, जांबेला पहिली लॉरी आली ती चैत्र शु. ५
रात्रीं साडेदहाला येऊन पोंचली. तिला परतुडपासून जांबेपर्यंत हातेडच
बाजूनें पंधरा मैल येण्याला चार तास लागले. तींत श्री. चों
महाराज व त्यांची शिष्यमंडळी होती. त्यांना इतकी तसदी झाली
लॉरीचा धोका वाटला कीं, त्यांनीं मला बजाविलें, ' सर्वांना कळ
लॉरीनें कोणी येऊं नका, क्षणोक्षणीं धोका आहे '. धोका होता खरा
पण त्या दिवसापासून तों नवमीपर्यंत आणि नंतर परतण्यास
तीन चार दिवस लॉरींचा येण्याचा आणि जाण्याचा धुमधडा
चालू होता. दुसऱ्या च दिवशीं म्हणजे चैत्र शु. ६
रात्रीं नागपुरचे डॉ. परांजपे, तळोद्याचे श्रीमंत भाऊसाहेब बार
जहागीरदार, श्री. विनायक महाराज आणि त्यांचे शिष्य, श्री. वा
नाईक साहेब, श्री. बाई राजे वगैरे मंडळींच्या लॉरी आल्या. सव
त्रास झाला, पण जातांना पुन्हां सर्व जण लॉरी करून च गेले. 

दहा दिवस लॉरींच्या सारख्या येरझारा सुरू होत्या, सर्वांना त्रास होत होता व धोका वाटत होता, पण श्रीसमर्थांची च कृपा अशी कीं, एक हि अपघात झाला नाहीं. अपघाताची भीति सर्वांना पदोपदीं आणि क्षणाक्षणाला वाटे, पण अपघात मात्र एक हि घडला नाहीं. तथापि दर वर्षी श्रीसमर्थांना असें च शिणवावयाचें असा याचा अर्थ नव्हे. मला पूर्ण आशा आहे कीं, श्री. महाराजा बहादुर सरकार व त्यांचे खाजगी कारभारी श्री. गुंडेराव हे पुढील उत्सवाचे आंत परतुड तें जांब सुंदर व निर्भय असा रस्ता तयार करविण्याची कृपा करतील.

समारंभाच्या दिवसांत भोजन, पाणी, दिवाबत्ती व आरोग्य या चारी बाबतींत उत्कृष्ट व्यवस्था होती, यांत शंका नाहीं. सातारा जिल्ह्यांतील कासेगांवचे श्री. पांडुरंग रामचंद्र ऊर्फ बळवंतराव वैद्य हे आपल्या धंद्यांत निष्णात असून आपल्या परोपकारी स्वभावानें ते त्या सबंध जिल्ह्यांत लोकप्रिय झालेले आहेत. जरुरीपुरतीं औषधें घेऊन आपण जांबेस येऊं असें त्यांनीं माघ व. ९ स गडावर च कबूल केलें होतें. त्याप्रमाणें ते आले होते व त्यांचा उपयोग हि झाला. सुमारे वीस लोकांस आपणांस औषधोपचार करावा लागला, त्यांपैकीं चार जणांच्या बाबतींत मात्र औषधोपचाराची फार च आवश्यकता होती. सोलापूर म्युनिसिपालिटीचे सॅनिटरी इन्स्पेक्टर रा. शंकर परशुराम कारखानीस हे सहज मार्गांत जांबेस आले होते, पण त्यांचा किती तरी उपयोग झाला! त्यांनीं नदीच्या पाण्यावर नियंत्रण ठेवून तें बिघडूं दिलें नाहीं व आरोग्याच्या आणि स्त्रीपुरुषांच्या सोयीच्या दृष्टीनें जरूर त्या सर्व तजविजी केल्या होत्या. प्रतिपदेपासून दशमी-पर्यंत प्रत्यहीं जरूर तितक्या बत्त्या अष्टीहून मागविण्यांत येत होत्या, त्यामुळें दिवाबत्तीची मुळीं च काळजी उरली नव्हती. दिवाबत्तीवर श्री. अनंतदास यांची देखरेख होती व सप्तमी, अष्टमी, नवमी आणि दशमी असे चार दिवस तर त्यांनीं सबंध गांवांत अंधाराला राहण्याला कोठें च सबड

ठेवली नव्हती. जांबेच्या नदीला दरसाल चैत्रापर्यंत पाणी टिकत नसतें, पण यंदा तें समारंभ होऊन जाईपर्यंत होतें, त्यामुळें पुष्कळांची फार सोय झाली. पुष्कळ जण आपआपली स्नानसंध्या हि नदीवर च उरकत असत. जांबेस पाण्याचें दुर्भिक्ष सहसा नसतें. गांवांत आणि गांवाबाहेर विहिरी पुष्कळ च आहेत. श्रीसमर्थमंदिराजवळ च कुळकर्ण्यांची विहीर आहे. पण सर्वांना आठवण राहील अशी एक गोड आणि थंड पाण्याची विहीर श्रीसमर्थमंदिरापासून जवळ च रामजीशामजींच्या समाधीपाशीं आहे. समारंभापूर्वी एक महिना आधीं श्री. नाईक साहेब जांबेस गेले होते तेव्हां च त्यांनीं समारंभांत या विहिरीवर रहाटगाडगें बसविण्याचें ठरविलें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं एक रहाटगाडगें व तें बसविण्यासाठीं व त्यावर देखरेख ठेवण्यासाठीं एक मनुष्य अशीं नांदेडहून पाठविलीं होतीं. हजारों लोकांना या सोयीचा उपयोग झाला. उन्हाचा त्रास सोसून परतुडपासून जांबेस यावें व त्या विहिरीवर जाऊन मनसोक्त स्नान करून सर्वांना श्रमपरिहार झाल्यासारखें वाटावें. म्हणून तेव्हां-पासून सर्वानुमतें या विहिरीचें

## आनंदकूप

असें नांव ठेवण्यांत आलें. किती हि यात्रा येवो, अन्नाचे बाबतींत कोणाची हि गैरसोय होऊं द्यावयाची नाहीं, असा श्रीमंत वामन नाईक साहेब यांनीं मनाशीं निर्धार करून ठेवला होता. पंचवीस तीस हजार पान होईल, अशी कल्पना करून जरूर तेवढा बहुतेक सारा माल श्री. नाईक साहेब यांच्या हुकमानें हैद्राबाद, निजामाबाद, नांदेड आणि परभणी या ठिकाणांहून जांबेस येऊन पडला होता. तो माल परतुडास आगगाडींतून उतरून घेण्या-साठीं शंकरराव जोग यांस परतुडास सात आठ दिवस सारखें रहावें लागलें. नाईक साहेबांच्या हुकमानें ठिकठिकाणांहून माल येणार व परतुडास तो घेणार शंकरराव जोग, अशी संगती लागल्यावर उत्साहाला

भरती यावी, हें अगदीं स्वाभाविक होतें. जांबेस सामानाच्या रोज आठ आठ, दहा दहा बैलगाड्या येऊं लागल्या. प्रत्यहीं सकाळीं अकरा बारा वाजेपासून भोजनास सुरवात व्हावी तों रात्रीं दहा अकरा वाजेपर्यंत पंक्तीमागून पंक्ती उठत. कोठीवर आणि वाढण्यावर स्वयंसेवक हि असे खंबीर असत कीं, त्यांनीं कष्ट करतांना शरीराकडे पाहूं च नये! धन्य त्या सर्वांची!!

## एक मोठी थोरली गैरसोय

मात्र सर्वांना जाणवली. तिच्या पुढें आमचा इलाज चालला नाहीं, इतकें खरें. जेवढे जांबेस आले तेवढ्या सर्वांची उतरण्याची सोय आम्ही करूं शकलों नाहीं, याचें अति वाईट वाटतें. आधीं तजवीज झाली नाहीं, आणि ऐन वेळेवर कांहीं सोय करणें, शक्य उरलें नाहीं. श्रीरामाच्या मठांत माणसावांचून कोपरा उरला नव्हता, पाटलांचा वाडा गच्च भरला, घर रिकामें राहिलें नाहीं, जोशी मंडळींचीं घरें खालीं राहिलीं नाहींत, कोणत्या हि घराचें आंगण रिकामें उरलें नाहीं, स्थापत्यविशारद रहात तें घर माणसांनीं आंतबाहेर फुलून गेलें, पाहुणें मंडळी नाहींत, असें गांवांत घर उरलें नाहीं, बाहेरचीं दुकानें लागलीं होतीं तीं हि माणसांनीं भरलीं, तेव्हां जो एक मोठा थोरला मांडव दिला होता त्यांत च जो येई त्यास उतरण्यास सांगावें लागलें. अशा वेळीं मला अति ओशाळल्यासारखें व्हावें व वाटे कीं, आपण आतां पळून जावें! पण पळालों नाहीं, खालीं मान घालून तसा च राहिलों. लोकांनीं गैरसोय मानली नाहीं, हा त्यांचा मोठेपणा. श्रीसमर्थांना पाहिलें, आनंद आहे, या सुखापुढें कोणती च गैरसोय भासणें शक्य नव्हे, असें सर्वांनीं म्हणावें, पण गैरसोय न होणें वेगळें आणि न मानणें वेगळें, हें मला समजतें. यंदा जसा एक च मोठा मांडव होता, तसे पुढील वर्षीं जरूर तेवढे मांडव घालून सर्वांची सोय केल्यावांचून यंदा घडलेल्या चुकीबद्दल प्रायश्चित्त घेतल्यासारखें होणार

नाहीं. एवढी एक गैरसोय वगळली, तर बाकी कोठें उणें पडलें असें वाटत नाहीं. झालेल्या गैरसोयीबद्दल सर्वांनीं क्षमा करावी, अशी प्रार्थना आहे. समारंभास

## कोण कोण आले

होते, तें पाहून अशांची आपल्या हातून गैरसोय झाली, याचें वाईट वाटलें. फार थोर थोर लोक आले होते. सारा बृहन्महाराष्ट्र आला होता. या चैत्र शु. ९ स काशीपासून रामेश्वरपर्यंतचा सारा बृहन्-महाराष्ट्र जांबेस समारंभास लोटला होता, असें मला भासलें. या दिवशीं प्रत्येक महाराष्ट्रियाचें लक्ष—मग तो शरीरानें दिल्लीस असो किंवा तंजावरास असो—जांबेकडे लागलें होतें. श्रीसमर्थांच्या मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचा समारंभ अपूर्व झाला, हें ऐकून सर्वांनीं आपआपल्या ठिकाणीं संतोष मानला. ज्यांना प्रत्यक्ष येणें शक्य होतें, ते सारे आले. ज्यांना अड-चणीमुळें येतां आले नाहीं, ते जागच्या जागीं हळहळल्यावांचून राहिले नाहींत. " जांबेस समारंभप्रसंगीं हजर राहून दर्शनाचें भाग्य लुटावें अशी अत्यंत उत्कट इच्छा, पण ती साध्य होण्याच्या मार्गांत तितकी च अनिवार अडचण उपस्थित होत आहे, हें अत्यंत जड व व्यथित मनानें आपणांस कळविणें भाग पडत आहे * * * * अंतश्चक्षूंनीं त्या वेळेस समर्थांच्या चरणांचें दर्शन घेण्याचा प्रयत्न करीन * * *. " हें लिहिणें केवळ औपचारिक आहे, असें मी मानीत नाहीं. न येणारांनीं औपचारिक पत्रें पाठविण्याचा प्रघात आहे, हें मला ठाऊक आहे, पण त्याबरोबर हें हि मला ठाऊक आहे कीं, जातां न आलें म्हणून जिव्हाळ्यावांचून इतकें व्यथित मन कोणाचें होत नाहीं. " योजिलेलें महत्कार्य श्रीसमर्थांच्या कृपेनें यशस्वी होवो, या सदिच्छेचा श्रीसमर्थांच्या दरबारीं उपयोग खात्रीनें होईल, " असे आत्मविश्वासाचे शब्द औपचारिक लेखणींतून कधीं उतरत नसतात. जे येऊं शकले नाहींत, अशांपैकीं कित्येकांकडून जीं

अत्यन्त कळवळ्याचीं पत्रें आलीं तीं सारीं श्रीसमर्थचरणीं विदित केलीं. अशा

## थोरांचा आशीर्वाद

हें च श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचें मुख्य बळ होय, असें मी मानीत आलों आहे. ज्यांना येतां आलें नाहीं, ते जागच्या जागीं स्मरण करीत राहिले. परंतु ज्यांना येणें शक्य झालें, ते घरीं राहूं च शकले नाहींत. बंगळूरचे व्यंकटेशराव कल्याणपुर मातुःश्रीसह आले होते, अहमदाबादचे अनंतराव वणीकर सहकुटुम्ब सहपरिवार आले होते, नागपुरचे डॉ. लक्ष्मण वासुदेव परांजपे तत्प्रांतीय मित्रमंडळीसह आले होते, मुंबईचे विष्णुपंत गाडगीळ व त्र्यंबक भास्कर खरे ऑडिटर घरीं राहूं शकले नाहींत, पुण्याचे आठवणीकार सदाशिवराव बापट, बडोद्याचे बळवंत वामन महाबळ, शहापुरबेळगांवचे वामनभटजी बाळेकुंद्रीकर, मसूरशहापुरचे एकनाथपंत व भिवराव कुळकर्णी, पंढरपुरचे कृष्णाजी विठ्ठल महाजन, कासेगांवचे बळवंतराव, सांगलीचे बाबुराव कोटनीस महाराज, जामनेरचे गणपतराव देशमुख, कोपरगांवचे दामोदर नारायण शिंपी, लातूरचे काकासाहेब परांजपे, इत्यादि असंख्य मंडळींना जांबेस न येणें असह्य च झालें असतें. आपआपल्या गुणांनीं ही सारी मंडळी जगाला परिचित असतील, असें नाहीं, पण श्रीसमर्थांच्या दरबारांत ज्यांना हक्कानें स्थान मिळावें, अशा योग्यतेची ही सर्व मंडळी आहेत. अनंत सखाराम वणीकर म्हणजे ते, जे आज दहा अकरा वर्षें नियमानें दरमहा श्रीसमर्थदरबारांत दहा रुपये कर समजून भरीत आले आहेत! इंदुरचे गंगाधरपंत पिंगळे समारंभांत एकदां ओझरते दिसले, पण केव्हां आले आणि गेले नीटसें समजलें हि नाहीं. कोणी वर्तमानपत्रांत लिहिलें आहे कीं, जांबेस फार मोठाली मंडळी आली नव्हती. पण जे आले होते त्यांच्याहून आणखी मोठी मंडळी मला कोठें पहावयास मिळतील काय? इतके प्रेमपिसे

थोर लोक श्रीसमर्थकार्यासाठीं एका जागीं आलेले असे, पूर्वीं कोठें माझ्या पाहण्यांत आले नव्हते. श्री. चौंडे महाराज, श्री. विनायक-महाराज, श्री. नारायणमहाराज इत्यादि महाराजमंडळींनीं शिष्यपरि-वारासह येऊन समारंभाच्या वैभवांत भर घातली होती. कोल्हापुर, सांगली, फलटण, सातारा, रत्नागिरी, कुलाबा, मुंबई, ठाणे, पुणे, नगर, नाशिक, सोलापुर, खानदेश, इत्यादि महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्यांतून भाविक लोक आले होते. वऱ्हाड आणि मध्यप्रांतांतील मराठी जिल्हे यांची हि हजिरी लागली होती. निजामसरकारच्या राज्यांतील मराठवाड्यांपैकीं जेथून कोणी च आले नाहींत, असें एकादें तरी मोठें गांव उरलें असेल कीं काय, शंका च आहे. श्रीमंत वामन नाईक साहेब, पांडुरंगराव जोशी वकील साहेब, गुंडेरावसाहेब, रेंगे रावसाहेब, गोविंदराव नानलसाहेब, धामणगांवकर श्रीमंत नानासाहेब इत्यादि चालू पिढींतील कर्तृत्ववान् मंडळी आली होती, यांत विशेष नवल नाहीं, पण पूर्वीच्या पिढींत नाणावलेले गुलबर्ग्याचे गिरिराव आण्णा वकील किंवा आमच्या तळोद्याचे जहागीरदार श्रीमंत भाऊसाहेब बारगळ अशा सारख्या वयपरत्वें शरीरानें पराधीन झालेल्या अनेक सद्गृहस्थांनीं सर्व अडचणी सोसून सहाय्यार्थ कोणी तरी गडीमाणसें बरोबर घेऊन समारंभास येण्याची तसदी घ्यावी, या भक्तिप्रेमाचें विशेष कौतुक वाटल्यावांचून कसें रहावें ? हैद्राबाद, गुलबर्गा, औरंगाबाद, बीड, बेदर, माजलगांव, परभणी, परळी, पैठण, हिंगोली, सेलु, गेवराई, परंडा, डोमगांव, राक्षसभुवन, शहागड, आंबड, जालना, परतुड, इत्यादि शेंकडों लहानमोठ्या ठिकाणांहून आलेल्या लोकांची निष्ठा पाहून चित्ताचें समाधान व्हावें. समारंभास आलेल्या स्त्रियांची संख्या हि थोडी थोडकी नव्हती. श्रीमंत बाई राजे यांनीं कुमारी इंदु राजे यांसह येण्याची कृपा केल्यामुळें मला फार संतोष वाटला. श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याकडे बाई राजे यांचें पहिल्यापासून लक्ष आहे व त्याप्रमाणें या कार्याला वेळोवेळीं



त्यांच्या कडून मदत हि झाली आहे. श्री रामदास आणि रामदासी मासिकाच्या त्या आरंभापासून नियमित वाचक आहेत. श्रीमंत सौ. मुक्ताबाई नाईक साहेब यांनीं येऊन तर नवमी आणि दशमी असे दोन दिवस भांडारगृहावर देखरेख ठेवली होती व काय आहे, नाहीं, याची चौकशी करून कांहीं कमी पडूं देऊं नका, असें बजावलें होतें, असें मला कळलें आहे. अष्टमीच्या दिवशीं सकाळीं निघालेल्या मिरवणुकीचा जो फोटो या अंकांत आला आहे, त्यांत पुढच्या भागीं चाललेल्या स्त्रियांची जी अगदीं पुढची रांग आहे तींत डाव्या बाजूनें चवथ्या चालल्या आहेत त्या श्रीमंत सौ. मुक्ताबाई साहेब होत. त्यांच्या च उजव्या हाताला म्हणजे तिसऱ्या जागीं कु. इंदु राजे आहेत व डाव्या हाताला एक सोडून पलिकडे चाललेल्या, किंवा त्या रांगेंतील उजव्या हाताला पहिल्या च आहेत त्या बहुधा प्रसिद्ध कीर्तन करणाऱ्या श्री. रंगुताई लिंबकर असाव्यात, असें वाटतें. जांबेचा समारंभ अपूर्व होण्याला जीं अनेक कारणें झालीं, त्यांत असंख्य थोर स्त्रीपुरुषांचें आगमन हें एक प्रमुख कारण होय.

जांबेस जे अनेक लोक आले होते त्यांच्या संबंधानें एक गोष्ट सर्वांच्या च लक्ष्यांत आली असेल, असें वाटत नाहीं. आलेल्या प्रमुख लोकांपैकीं बहुतेक लोकांसंबंधानें मला एक विधान असें करतां येतें कीं, जे आले ते बहुतेक निष्ठावंत होते. करमणुकीसाठीं, मौज पाहण्यासाठीं किंवा गंमत म्हणून कोणी च आले नव्हते. जे आले त्यांना त्यांचें श्रीसमर्थप्रेम घरीं बसूं देईना म्हणून आले. असें असल्या मुळें दुसरी एक गोष्ट अशी नजरेस आली कीं, येणारांचा सामाजिक दर्जा, त्यांच्या त्यांच्या गांवीं, लहान असो किंवा मोठा असो, जे आले ते येतां क्षणीं च स्वतःस

स्वयंसेवक

समजून कामास च लागले, शंभर उदाहरणें देतां येतील. उदाहरणार्थ, नागपुरचे डॉक्टर परांजपे यांना सर्व जण ओळखतात. ते नागपुरचे

एक प्रख्यात शस्त्रवैद्य आहेत. तेथें त्यांचा स्वतंत्र दवाखाना आहे. शस्त्रक्रियेचीं कामें, कधीं कधीं, त्यांच्या मागें इतकीं असतात कीं, घरीं येऊन शांतपणें जेवण्यास हि त्यांना फुरसत होत नाहीं. झाली च फुरसत तर घाईघाईनें चमच्याच्या सहाय्यानें टेबलावर ते जेवतात व लागलीं च बाहेर पडतात. ज्यांच्या हाताला भाताचें शीत घरीं सहसा लागत नाहीं, त्या डॉक्टर परांजपे यांना जांबेस भांडारघरांत चरांवरून भाताचीं मोठमोठालीं भांडीं उतरून भात उकरतांना आणि तो तसा च अत्यन्त कढत भात, हात पोळत असतां हि पंक्तींत हातानें वाढतांना मीं पाहिलें. अशा शंभर जणांच्या शंभर गोष्टी पाहिल्या. पडेल ती श्रीसमर्थांची सेवा करण्यास प्रत्येक जण पुढें असे. रा. हरिभाऊ घाणेकर व रा. विनायकराव शिराळकर यांनीं कोठी सांभाळली. आलीपाळीनें शरीर-धर्मासाठीं ते बाहेर जाऊन येत आणि कोठी सांभाळीत. अष्टमीच्या रात्रीं आणि नवमीच्या रात्रीं त्यांना झोंप घेण्यास क्वचित् च सवड मिळाली असेल. ते सारखे जणूं पहाऱ्यावर हजर असत. केव्हां, कोण, काय मागण्यास येईल याचा नेम नसल्यामुळें ते सारखे जागरूक होते. रा. गणेश सखाराम निगडीकर आणि गोव्याचे अनंतबुवा रामदासी यांनीं स्वयंपाकाला आणि पिण्याला पाणी पुरविलें. फक्त पूर्व रात्रीचे कांहीं तास त्यांचे हात रहाटापासून दूर होत, बाकीचा सारा वेळ रहाटावर असत. रा. विष्णुपंत पुराणिक यांच्या पायांना उसंत नव्हती. ते सर्वव्यापी होते. पाहुण्यांची आणि वैदिक मंडळींची व्यवस्था ते पहात. यज्ञकुंड तयार करवून घेण्यांत ते होते च. स्वाहाकारांत होते, अर्चेत होते, सर्वत्र होते. याज्ञिकाच्या कामापासून तों वाढण्याच्या कामापर्यंत पडेल तें काम त्यांनीं करावें. सर्व कामांत पाकशालेंतील कामें अति दगदगीचीं होत. त्या कामावरचे व्रतस्थ म्हणजे धुळ्याचे नानासाहेब ठाकुर, पिंपळनेरचे कृष्णराव करमरकर, पुण्याचे गणपतराव दामले आणि नागपुरचे डॉ. परांजपे होत. भात उकरण्यांत आणि शस्त्रक्रिया करण्यांत



जांबेच्या समारंभासाठीं आलेले कांहीं स्वयंसेवक

कांहीं साधर्म्य आहे कीं काय, न कळे. भात उकरण्याचें काम नेमकें डॉक्टरांच्या वाट्याला येई. दशमीच्या दिवशीं हीं कामें हैद्राबादसंस्थानांतील मंडळींनीं मुद्दाम आपणांकडे घेतलीं आणि व्यवस्थेनें पार पाडलीं. परभणीचे गोविंदराव नानल वकील साहेब हे त्या दिवशीं बल्लवाचार्य बनले होते. या सर्वांच्या मदतीला आणि पडतील तीं कामें करण्याला सर्व श्री रामदासी मंडळी, नाशिकच्या अनाथ विद्यार्थीगृहांतील अठ्ठावीस विद्यार्थी आणि तीन शिक्षक, परभणीच्या हनुमान आखाड्यांतील दहा जण, व पुणें, सातारा, वऱ्हाड या भागांतील कांहीं मंडळी सज्ज होती. श्री. नारायणमहाराज आणि नारायणबुवा जोग यांच्या नेतृत्वाखालीं श्री रामदासी मंडळींनीं तर रस्ते झाडावे, जागा साफ कराव्या, हजारों घागरी पाणी ओढावें आणि गांवभर शिंपडावें. अशीं अशीं कामें करून या सर्व लहान थोर स्वयंसेवकांनीं त्या दिवसांत श्रीसमर्थांचें चित्त संतोषविलें असलें पाहिजे. त्यांचा हेवा कोणास वाटणार नाहीं ? उत्सवाचे बाबतींत

## इतरांची हि मदत

पुष्कळ झाली. जांबेचे बाळाजी पाटील आणि आप्पाराव पाटील यांनीं मनावर घेतल्यामुळें फाल्गुन व. १२ ला ( ता. २१४ रोजीं ) सबंध गांवच्या लोकांनीं मंडपाची जागा साफ करण्याचे कामीं मदत केली. तसें च कंडारीचे पाटीलबुवा, अष्टीचे दाजीबा पाटील, सृष्टीचे सुरतकरण मारवाडी आणि मुगाजी पाटील, ढिंबीकर बाळाजी पाटील, परतुडचे बद्री शेट, सीताराम रघुनाथ कुळकर्णी, गोविंदराव साहेब वकील, भादलीचे राधाकिसन मारवाडी, धामणगांवचे जहागीरदार श्रीमंत नानासाहेब आणि त्यांचे उत्साही चिरंजीव भाऊसाहेब व कारभारी, या सर्वांनीं कोणी कांहीं कोणी कांहीं, अशा रीतीनें राहुट्या, तंबु, बैठकी, मंडप, गालिचे, खुर्च्या, लहानमोठीं निरनिराळीं भांडीं, मांडवाचे सामान, इत्यादि वस्तु पुरवून मदत केली. धामणगांवचे भाऊसाहेब आणि कारभारी यांनीं तर मांडवाचें सामान आणून स्वतःच्या देखरेखी-

खालीं स्वतःच्या माणसांकरवीं स्वाहाकाराचा मांडव आणि अर्चेचा मांडव, असे दोन्ही मांडव उभे करून दिले.

## ऋग्वेदसंहितेच्या स्वाहाकारास आरंभ

चैत्र शु. २ ( ता. ८।४।३२ ) पासून होईल असें आमंत्रणपत्रिकेंत जाहीर झालें होतें. परंतु ती मिति हैद्राबादच्या मंडळीस सोयीची नसल्यामुळें स्वाहाकारास आरंभ चैत्र शु.५ पासून करावा व अर्चा शु. ८ व ९ स करावी आणि दोन्ही अनुष्ठानांची पूर्णाहूति शु. ९ स च व्हावी, असें सर्वांच्या विचारानें ठरलें. शु. २ प्रथमपासून जाहिर झालेली असल्यामुळें कांहीं वैदिक मंडळी ठरल्याप्रमाणें प्रतिपदेस च येऊन दाखल झाली होती. कुंड व वेदी तयार करण्याकरितां शु. ३ स सकाळीं साडे दहा वाजतां भूमिपूजन होऊन शु. ४ रोजीं कुंड आणि वेदी हीं वे. पांडुरंग भटजी गोरे सोलापुरकर, वे. बाळंभटजी बोरगांवकर व धुळ्याचे वे. विठ्ठल भटजी करमरकर व वे. रामशास्त्री बापट यांच्या देखरेखीखालीं तयार झालीं. शु. ४ पर्यंत सर्व वैदिक मंडळी येऊन थडकली. सर्व महाराष्ट्रांतून अति

## विद्वान् नामांकित वैदिक मंडळी

अनुष्ठानासाठीं आलेली होती. अशा अपूर्व, असामान्य, ऐतिहासिक महत्त्वाच्या प्रसंगीं स्वाहाकारांत भाग घेण्याचें भाग्य आपल्या हि वाट्याला यावें, या मुख्य भावनेनें सर्व जण आले होते. बरोबर चाळीस मंडळी जमली होती. अशा तोलाचे इतके विद्वान् वैदिक अन्यत्र क्वचित् च एकत्र जमले असतील. काळमान पाहून भीति वाटते कीं, पांच पन्नास वर्षांनीं, पुढच्या पिढ्यांच्या लोकांना अशी मंडळी पहावयास तरी मिळेल काय ? म्हणून मुद्दाम त्यांना विनंति करून त्यांचा फोटो घेण्यांत आला. प्रत्येकास येण्याजाण्याचें भाडें देण्यांत आलें व शिवाय प्रत्येकाची अल्प संभावना



स्वाहाकार आणि अर्चा या अनुष्ठानांसाठीं जांबेस आलेली वैदिक मंडळी

करण्यांत आली. त्याप्रीत्यर्थ सुमारें एक हजार रुपये खर्च आला. पण आपण यांची किती हि संभावना केली असती, तरी ती त्यांच्या योग्यतेच्या मानानें कमी च पडली असती. हें कांहीं कोणाच्या घरचें खाजगी कार्य नव्हे, तें सार्वजनिक आहे, हें जाणून या मंडळींनीं हि द्रव्याची फारशी अपेक्षा केली नव्हती. हें मी औपचारिक लिहित नाहीं, यथार्थ तें च लिहित आहे कीं, श्रीसमर्थांची सेवा करण्याची अशी संधी कोणास लाभणार आहे, या च मुख्य विचारानें ही मंडळी आली होती. या सर्वांचीं तीं थोर अंतःकरणें पाहून मला त्यांचे फार उपकार वाटले.

## स्वाहाकारासाठीं मंडप

श्रीसमर्थमंदिराच्या आवारांत वायव्य कोपऱ्यांत व अर्चेचा मंडप ईशान्य कोपऱ्यांत देण्यांत आला होता. दोन्ही मांडव लतापल्लवांनीं सुशोभित केलेले होते.

चैत्र शु. ५ सोमवारीं प्रातःकाळीं सर्व वैदिक मंडळी, सांप्रदायिक मंडळी, भक्तमंडळी, ग्रामस्थ ब्रह्मवृंद, वगैरे मंडळी आपआपलीं स्नानसंध्यादि नित्य कर्में आटोपून सात वाजतां स्वाहाकारमंडपासमीप दाखल झाली. नंतर आपल्या भालदार, चोपदार, इत्यादि लवाजम्यासह श्री. आबासाहेब महाराज यांची स्वारी पत्नीसहवर्तमान येऊन त्यांचे करितां मांडून ठेवलेल्या वेदीजवळील व्याघ्रासनावर विराजमान झाली आणि लागलीं च कर्मास आरंभ करण्यांत आला. आरंभीं महाराजांनीं कर्माधिकारार्थ प्रायश्चित्त, पंचगव्यप्राशन, नूतनयज्ञोपवीतधारण व गायत्रीजपादि कर्में केलीं. त्या अवकाशांत वैदिक मंडळींनीं शांतिसूक्तादिकांचें पठण केलें. नंतर महाराजांकडून

मम अस्य राष्ट्रस्य च सकलैनोनिबर्हणपूर्वकं
सकलाभीष्टसिद्धिद्वारा श्रीवेदपुरुषप्रीत्यर्थं
सग्रहमखं ऋग्वेदांतर्गतशाकलसंहिताहवनं करिष्ये ॥

असा प्रधान संकल्प करण्यांत आला. नंतर आचार्यादिवरणान्त कर्म झाल्यावर महाराज परत श्रीराममंदिराकडे गेले आणि नंतर वृत आचार्य वे. विष्णुभटजी करमरकर व ब्रह्मा वे. महादेव भटजी गाडगीळ वाईकर ह्यांनीं आचार्यकर्मास प्रारंभ करून मंडलदेवता व मुख्य देवता ह्यांचें स्थापन केलें व अग्निस्थापन, ग्रहस्थापन, संहितास्वाहाकाराचें अन्वाधान इत्यादि पूर्वांगकर्मे करून ग्रहांचें व कर्मांगदेवतांचें हवन केलें आणि नंतर संहितास्वाहाकारहवनास बरोबर पावणे बारा वाजतां प्रारंभ झाला.

माझ्या अवलोकनांत पूर्वी ऋग्वेदसंहितास्वाहाकार आला नव्हता. प्रत्येक मंत्राच्या आरंभीं ॐ व अंतीं स्वाहा म्हणून घृतयुक्त तिलांचें हवन केलें जात होतें. प्रसंग गंभीर वाटला. हवन होत असतां सर्वत्र शांति आणि गांभीर्य हीं पसरलीं होतीं. वैदिक-मंडळींची धन्यता वाटली. त्यांचें चाललेलें पठन ऐकण्यांत हि आनंद होता.

## हवन करणाऱ्या पाठक मंडळींचीं नांवें

क्रमशः येथें देतों.

प्रथम दिन शु. ५

| अष्टक | अध्याय | पाठक |
|---|---|---|
| १ | १ | वे. बाळं भटजी बोरगांवकर व वे. बाळं भटजी पुजारी ( उभयता नरसोबाच्या वाडीचे ) |
| | २ | वे. गणेश भटजी साने ( नाशिक ) व वे. दत्तं भटजी तारे ( धुळें ) |
| | ३ | वे. विठ्ठल भट अध्यापक ( सोलापुर ) व वे. गोविंद भट ब्रह्मावर्तकर |
| | ४ | वे. लक्ष्मण भट उमराणी ( कऱ्हाड ) व वे. महेश्वर भट पाध्ये ( मलकापुर सं. कोल्हापुर ) |
| | ५ | वे. सीताराम भट शुक्ल ( परळी ) व |

वे. केशव गुरुजी आजेगांवकर ( निजामराज्य )

६ वे. आप्पादेव पाथरीकर व

वे. दगडं भटजी धर्माधिकारी ( परळी )

७ वे. शंकर भट शुक्ल ( परळी ) व

वे. बाळंभट धर्माधिकारी ( परळी )

८ वे. बाळंभट धर्माधिकारी व

वे. शंकर भट शुक्ल

तों दुपारचे तीन वाजले.

द्वितीय दिन शु. ६

आरंभ सकाळीं ७॥

| अष्टक | अध्याय | पाठक |
|---|---|---|
| २ | १ | वे. गणेश भटजी जोशी ( परळी ) व |
| | | वे. सीताराम भटजी शुक्ल ( परळी ) |
| | २ | वे. गणेश भटजी जोशी ( परळी ) व |
| | | वे. बाळंभट धर्माधिकारी ( परळी ) |
| | ३ | वे. महादेव भट पुरोहित ( मलकापुर ) व |
| | | वे. आबादेव भारदे ( हैद्राबाद ) |
| | ४ | वे. बाळंभटजी पुजारी व |
| | | वे. महेश्वरभट पाध्ये |
| | ५ | वे. दगडंभट धर्माधिकारी व |
| | | वे. केशव गुरु आजेगांवकर |
| | ६ | वे. बाळंभट धर्माधिकारी व |
| | | वे. शंकर भट शुक्ल |
| | ७ | वे. शंकर भट काशीकर ( जिंतूर ) व |
| | | वे. आप्पादेव पाथरीकर |
| | ८ | वे. दामोदरभट मराठे ( नाशिक ) व |

| | | |
|---|---|---|
| | | वे. विठ्ठलभट अध्यापक ( सोलापुर ) |
| ३ | १ | वे. बाळंभट पुजारी व वे. बाळंभट बोरगांवकर |
| | २ | वे. गणेश भट साने ( नाशिक ) व |
| | | वे. परशुराम भट दांडेकर ( नाशिक ) |
| | ३ | वे. गोविंद भट आठवले ( नाशिक ) व |
| | | वे. गणेश भट साने |
| | ४ | वे. बाळंभट पुजारी व |
| | | वे. गोविंदभट मांडवगणे ( ब्रह्मावर्त ) |
| | ५ | वे. विष्णु भट केळकर ( काशी ) व |
| | | वे. गोविंदभट मांडवगणे |
| | ६ | वे. शंकरभट जितूरकर व |
| | | वे. आपाभट पाथरीकर |
| | ७ | वे. परशुराम भट दांडेकर व |
| | | वे. गणेश भट साने |
| | ८ | वे. आप्पाभट पाथरीकर व |
| | | वे. शंकरभट जिंतूरकर |
| ४ | १ | वे. विठ्ठलभट अध्यापक व |
| | | वे. लक्ष्मण भट उमराणी |

तों दुपारचे ३ वाजले आणि या दिवसाचें कृत्य संपविलें.

तृतीय दिन शु. ७

सुरवात सकाळीं ७॥

| अष्टक | अध्याय | पाठक |
|---|---|---|
| ४ | २ | वे. परशुराम भट दांडेकर व |
| | | वे. गणेश भट साने |
| | ३ | वे. साने व वे. मराठे |
| | ४ | वे. आठवले व वे. अध्यापक |

५ वे. मराठे व वे. दांडेकर
६ वे. पाध्ये व वे. पुरोहित
७ वे. पुजारी व वे. आजेगांवकर
८ वे. पुरोहित व वे. गणेश भट जोशी
१ वे. उमराणी व वे. जोशी
२ वे. बोरगांवकर व वे. पुजारी
३ वे. जोशी व वे. बाळंभट धर्माधिकारी
४ वे. ब्रह्मावर्तकर व वे. दगडंभट
५ वे. दगडंभट व वे. शंकर भट शुक्ल
६ वे. शंकरभट शुक्ल व वे. बाळंभट धर्माधिकारी
७ वे. बाळंभट धर्माधिकारी व
वे. शंकर भट शुक्ल
८ वे. देवीदास भट टेंभे व
वे. सीताराम भट शुक्ल
१ वे. सीताराम भट शुक्ल व वे. टेंभे
२ वे. जितूरकर व वे. गोविंदभट रामपुरकर
३ वे. रामपुरकर व वे. जितूरकर

दुपारचे ३॥ झाले आणि दिवसाचें कार्य संपविलें.

चतुर्थ दिन शु. ८

आजचा आणि उद्याचा दिवस अति गर्दीचे. इकडे स्वाहाकारास सुरवात नित्याप्रमाणें सकाळीं ७॥ ला झाली आणि तिकडे श्रीसमर्थ-मूर्तीची मिरवणूक तयार होत होती.

| अष्टक | अध्याय | पाठक |
|---|---|---|
| ६ | ४ | वे. गणेशभट जोशी व वे. टेंभे |
| | ५ | वे. सांबा कोटंबे ( परळी ) व वे. टेंभे |
| | ६ | वे. गणेशभट मरुळकर व वे. रामपुरकर |

७ वे. रंगनाथ उंब्रजकर व वे. उमराणी
८ वे. भारदे व वे. आणा गोमूत्रे ( पैठण )
७ १ वे. दुर्गादास जोशी व वे. तात्या जोशी
२ वे. पाध्ये व वे. पुरोहित
३ वे. आठवले व वे. मराठे
४ वे. साने व वे. दांडेकर
५ वे. गणेशभट आठल्ये
६ वे. अध्यापक व वे. विष्णुभट करमरकर
७ वे. गणेशभट जोशी व वे. बाळंभट धर्माधिका
८ वे. सांबदेव अग्निहोत्री ( परळी ) व
वे. बाळंभट धर्माधिकारी
८ १ वे. शंकर भट शुक्ल व वे. सीतारामभट शुक्ल
२ वे. दुर्गादास जोशी व वे. जिंतूरकर
३ वे. आप्पाभट पाथरीकर व वे. जिंतूरकर
४ वे. टेंभे व वे. आजेगांवकर

तों चार वाजले.

पंचम दिन शु. ९.

आजचा मुख्य दिवस होय. बाराच्या पुढें प्राणप्रतिष्ठा व्हावयाची, र धोरणानें पूर्वींपासून च अध्यायांची विभागणी होऊन आजला थो अध्याय ठेवण्यांत आले होते. आरंभ सकाळीं ७॥

५ वे. रामपुरकर व वे. गणेशभट जोशी
६ वे. सांबभट कोटंबे व वे. गणेशभट जोशी
७ वे. सांबदेव अग्निहोत्री व वे. बाळंभट
धर्माधिकारी
८ वे. पुरोहित व वे. पुजारी

येणें प्रमाणें ऋग्वेदसंहितेच्या स्वाहाकाराचें अनुष्ठान वरील तेहतीस

जणांकडून यथासांग होऊन चैत्र शुद्ध ९ शुक्रवार रोजीं बरोबर अकरा वाजतां पूर्णाहुति झाली.

चैत्र शुद्ध अष्टमी आणि नवमी असे दोन दिवस स्वाहाकाराचें अनुष्ठान चालू असतां अर्चामंडपांत अर्चेचा समारंभ व्हावयाचा होता. त्यासाठीं चैत्र शु. ८ स सकाळीं

## श्रीराममंदिरांतून श्रीसमर्थमंदिरांत

श्रीसमर्थांची मूर्ति मिरवीत नेण्याचा अपूर्व समारंभ झाला. या मिरवणुकीचें यथार्थ वर्णन करणें माझ्या शक्तीबाहेरचें आहे. मिरवणूक अपूर्व होती, एवढें च म्हणतां येतें, जास्त काय सांगावें ? सर्व जनतेच्या नजरेस श्रीसमर्थांची मूर्ति या प्रसंगीं प्रथम च पडली. मूर्ति पाहून सर्वांचीं अंतःकरणें उल्हसित झालीं. जणूं प्रत्येकाचें हृदय श्रीसमर्थांच्या मूर्तीचें रूप धारण करून बाहेर पडलें होतें, इतकें सर्वांचें चित्त त्या मूर्तीवर खिळून गेलें होतें. कोणाला च दुसरें कांहीं दिसत नव्हतें. मिरवणुकीच्या मार्गावर सर्वत्र पाणी शिंपडलेलें होतें, प्रत्येक घरापुढें सडासंमार्जन झालेलें असून रांगोळ्या काढल्या होत्या. पताकांनीं सर्व मार्ग शृंगारलेला होता. श्रीसमर्थांच्या आणि श्रीशिवछत्रपतींच्या जयजयकारानें सर्व वातावरण दुमदुमून गेलें होतें. जयजयकारांत मिरवणूक मुंगीच्या पाउलानें चालूं झाली. पुढें स्त्रिया, नंतर पालखी, नंतर शृंगारलेल्या गाडीवर श्रीसमर्थांची मूर्ति आणि सर्वत्र दर्शनोत्सुक भक्तजनाचा गराडा, असा मिरवणुकीचा थाट होता. दुतर्फा सर्व घरें आंत, बाहेर, वर स्त्रीपुरुषांनीं फुलून गेलीं होतीं. त्या वेळीं आकाशाकडे कोणी पाहिलें नाहीं, पाहण्यास कोणास सवड झाली नाहीं. पण पाहिलें असतें तर स्वर्गांतून देव पुष्पवृष्टी करीत असलेले त्याच्या नजरेस पडले असते. या किंचित् वर्णनांत अतिशयोक्ति नाहीं. ज्यांनीं ती मिरवणूक पाहिली असेल ते भाग्यवान् होत. त्यांना विचारून पहा म्हणजे कळेल.

श्रीराममंदिराच्या पश्चिमेकडील दरवाज्यानें श्रीसमर्थ बाहेर पडले, ते उत्तरेकडे वळून, मोठ्या रस्त्यानें मिरवीत दूरून च श्रीमारुतीचें दर्शन घेऊन उजव्या हाताला वळून त्या रस्त्यानें स्थापत्यविशारद व कामगार यांच्या बिऱ्हाडावरून श्रीसमर्थमंदिराच्या प्राकाराच्या उत्तर दरवाज्यावरून पश्चिम दरवाज्यापाशीं आले आणि त्या दरवाज्यानें त्यांनीं मंदिराच्या आवारांत प्रवेश केला. स्वाहाकारमंडपावरून

## अर्चामंडपांत

श्रीसमर्थांची मूर्ति नेऊन तिच्या ठिकाणीं साक्षात् श्रीसमर्थस्वरूप प्रकट व्हावें म्हणून ती ब्राह्मणांच्या हवालीं करण्यांत आली. अर्चामंडपांत श्री. आबासाहेब महाराज आधीं च येऊन दाखल झाले होते. त्यांच्या हस्तें अर्चेच्या अनुष्ठानास आरंभ झाला, महाराजांनीं प्रधान संकल्प केला तो असा :

अस्यां मूर्तौ देवकलासांनिध्यार्थं
दीर्घायुर्लक्ष्मीसर्वकामसमृध्द्यक्षय्यसुखकामः
सराष्ट्रोऽहं वास्तुग्रहप्रासादपिंडिकासहितां
श्रीरामदासस्वरूपेण श्रीमारुतेः स्थिरप्रतिष्ठां करिष्ये ॥

येणें प्रमाणें संकल्प होऊन गणपतिपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन, नांदिश्राद्ध, आचार्यादिवरण इत्यादि कर्में झालीं.

आचार्य— वे. विठ्ठलभटजी करमरकर, धुळें
ब्रह्मा— वे. बाळंभटजी बोरगांवकर
सर्वोपद्रष्टे— वे. पांडुरंगभटजी गोरे, सोलापुर

याप्रमाणें कर्माधिकाऱ्यांच्या नेमणुका करण्यांत आल्या. स्वाहाकाराकडील वैदिक मंडळी अर्चेला उपयोगी पडत च, पण अर्चेकडे मुख्यतः वरील तिघे व वाईचे वे. महादेवभट गाडगीळ, पुण्याचे वे. रामभटजी भावे, धुळ्याचे वे. रामशास्त्री बापट व वे. नानाभट पटवर्धन व माळेगांवचे वे. बापुभट जोशी, अशी आठ मंडळी होती.



अर्चामंडपांत श्रीसमर्थांची मूर्ति

शांतिहोम व जलाधिवाससंस्कार होऊन श्रीसमर्थमूर्तीचा अर्चामंडपांत शयनविधि झाला, तों दुपारचे चार वाजले आणि अर्चामंडपांतील अष्टमीचा कार्यक्रम समाप्त झाला.

अखेरीस दुसऱ्या दिवशीं शुक्रवारीं महाराष्ट्राच्या परम भाग्याचा दिवस उजाडला.

## १८५४ चैत्र शुद्ध ९

चा सूर्य उदयाचलावर येऊन अर्चेचें अनुष्ठान पुढें चालू झालें. प्रथम श्रीसमर्थमूर्तीचें नेत्रोन्मीलन होऊन श्रीसमर्थांनीं पुनरपि कृपादृष्टीनें महाराष्ट्राकडे पाहिलें. नंतर सिंहासनाच्या संस्कारास प्रारंभ होऊन वास्तु-निक्षेप करण्यांत आला. नंतर सुमारें साडे अकरा वाजतां श्रीसमर्थांची मूर्ति अर्चामंडपांतून मिरवीत मंदिरास प्रदक्षिणा घालून मंदिराचे गाभाऱ्यांत नेण्यांत आली आणि

## बरोबर १२ वाजून ३९ मिनिटांनीं

सिंहासनावर मूर्ति स्थिर होऊन तिची स्थापना करण्यांत आली, तों आकाशांत सर्वत्र जयजयकाराचा एक च प्रचंड ध्वनि उमटला, वाद्यें वाजूं लागलीं, गुलाल उधळला गेला आणि श्रीसमर्थांचें दर्शन घेण्यासाठीं जनता उत्सुक झाली. हें इकडे होत असतां तिकडे समोरच्या मोठ्या मंडपांत श्री. चौंडे महाराज आणि त्यांचे शिष्योत्तम श्री. धेनुदास शंकरराव डोळे यांनीं गोपूजन करून कीर्तन चालू केलें होतें, तें हि या च जयजयकारांत समाप्त होऊन श्रीसमर्थांच्या दर्शनाला सारी जनता लोटली. दर्शनोत्सुक भक्तजनांची गर्दी दोन तासांत किंचित् हि ओसरली नाहीं. सायंकाळ पर्यंत सारखी रीघ लागली होती. बाहेरच्या बाजूस दर्शनाची गर्दी चालू असतां आंत मूर्तीची प्राणप्रतिष्ठा, न्यास, महापूजा इत्यादि विधि चालू होते. सुमारें अडीच वाजतां महापूजा आटोपून पूर्णाहुति झाली.

श्री. आबासाहेब महाराज यांनीं नंतर आचार्य, ब्रह्मा व ऋत्विज् यांचें पूजन करून

इमं शिलेष्टकादार्वादिनिर्मितं वलभीजगतीप्राकारगोपुरसंयुतं
घंटावितानध्वजपताकाद्यलंकृतं प्रासादं तत्तद्देवतालोककामः
राष्ट्रोद्धारार्थं श्रीसमर्थरामदासप्रीतये अहमुत्सृजामि ॥

असा उत्सर्गाचा संकल्प केला. तदनंतर अनुष्ठानकर्मांतील ब्राह्मणांचा शुभाशीर्वाद होऊन श्री. आबासाहेब महाराज, त्यांच्या पत्नी व शंकर श्रीकृष्ण देव यांस आचार्यहस्तें श्रीफळें देण्यांत आलीं. याप्रमाणें अर्चाकर्माची चाराच्या सुमारास समाप्ती होऊन सायंकाळीं सहा वाजतां भरणाऱ्या

## दरबाराच्या तयारीला

लागण्यास थोडी सवड मिळाली. समोरील मोठ्या मंडपांत सारख्या पंक्ती चालू असल्यामुळें श्रीसमर्थमंदिराच्या आवारांतील मागील बाजूस दरबाराची सभा भरविण्यांत आली. स्वागतमंडळाचे अध्यक्ष राजा धनराजगीरजी निदान नवमीचे दिवशीं जरूर येणार होते. त्यांचा तंबु आणि कांहीं माणसें पुढें आलीं हि होतीं, पण डॉक्टरांच्या सांगण्यावरून आयत्या वेळीं त्यांचा नाइलाज झाला. म्हणून मंडळाचे उपाध्यक्ष श्री. नाईक साहेब यांच्या अध्यक्षतेखालीं काम चालू झालें. प्रथम थोडा वेळ सतारवादन होऊन नाशिकच्या अनाथविद्यार्थीगृहांतील मुलांचे कांहीं पोवाडे झाले. नंतर ठाण्याचे अनंत शाहीर यांनीं या प्रसंगासाठीं श्रीसमर्थांवर रचलेला पोवाडा म्हणून दाखविला. तो श्रोत्यांना अति आवडला. तो ऐकण्यांत सारा श्रोतृसमाज गुंग झाला. शाहीरांची म्हणण्याची धाटणी हि वेधक होती. एकादा पोवाडा वाचण्यापेक्षां स्वतः सहृदय शाहिराच्या मुखांतून तो ऐकण्यांत दसपट जास्त गोडी वाटते. आपल्या नेमक्या पृष्ठांत तो सबंध पोवाडा देणें शक्य नव्हे. तेव्हां अनंत शाहिरांना च विनंति करून ठेवतों कीं,

त्यांनीं तो पोवाडा गात महत्तर महाराष्ट्रांत सवडीनें दौरा काढावा, त्या पोवाड्यानें जांबेस जसें सर्वांना गुंगवून सोडलें, ती च स्थिति तो पोवाडा सर्वत्र सर्वांची करील. आधीं च श्रीसमर्थांचें चरित्र अलौकिक, त्यांत तें पोवाड्यांत गायिलेलें आणि गाणारा स्वतः च सहृदय कवि इतकी सिद्धता असल्यावर जनतेचीं मनें आकर्षून घेऊन तीं श्रीसमर्थचरणीं लीन करण्याला आणखीं साधनें कोणतीं पाहिजेत ? सबंध पोवाडा येथें देणें शक्य नसलें तरी त्याची कल्पना व्हावी, म्हणून मधला थोडा भाग सादर करतों.

गातों पवाडा राष्ट्रसंताचा, देवभक्ताचा, दिव्य विभूतीचा, कृतिनं ज्यांनीं क्रांति केली समाजांत । जागृति केली महाराष्ट्रांत । आनंदवनभुवन स्थापिलं देशांत ॥ ध्रु० ॥

* * * *

तों करुणा आली देवाला । नेहमिंचाच प्रघात ठरलेला । अवतार त्यानं घेतला सद्धर्मसंस्थापनेला ॥ जी० ॥ केलं पुनीत जन्मानं महाराष्ट्रदेशाला । कुलकर्णि नांव केलं सार्थ, जन्म जांबेला । तिथं जमलों आज आपण समारंभाला । महाराष्ट्रधर्माचा उषःकाल जाहला । चैतन्यसूर्य तेजानं आला उदयाला । ज्यानं लागलं ग्रहण परदास्यअंधःकाराला ॥

* * * *

जनसमाज पाहिला प्रत्यक्ष देश हिंडून । भिक्षेच्या मिषानं धुंडून । परिस्थिति पाहिली पारखून । हतबल समाजस्थिति पाहुन आलं भडभडुन । काय हेरलं त्यांनीं हिंडून । आहे ठेविलं सर्व लिहून । 'अस्मानीसुलतानी' चं हृदयस्पर्शी प्रकरण । पहा एकदां तरी प्रत्यक्ष तुम्ही वाचून । काळजाला घरे पडतील ।

* * * *

लालभडक चित्र समाजाचं ऐसं रंगविलं । कारण तसं च होतं प्रत्यक्ष त्यांनीं पाहिलं । असं आकाश सर्व फाटलं । पण ठिगळ द्यायचं ठरविलं । हातपाय नाहीं गाळले । काय करूं एकटा मी रडत नाहीं बैसले । समर्थांची पाठी त्याला भय कोणाचं कसलं । दुष्कर कार्य महा धूर्ततेनं आरंभिलं । कारण होता आत्मविश्वास इष्ट तें मी केलं । ईश्वरी साह्य ऐशाला सहज ठरलेलं ॥

* * * *

कार्याला केली सुरुवात, घातला हात, मोठ्या शिस्तींत, सांगतों सारांश

त्याचा थोडक्यांत । असाचं फळ आलं त्यांच्या च आयुष्यांत । अशीं उदाहरणं थोडीं च जगतांत ॥ जी० ॥ हरिकथा मुख्य निरूपण, साह्य राजकारण, सर्व सावधान, अशा मार्गाचं ठेविलं प्रस्थान । दंड थोपटून केलं आव्हान । शत्रुची केली सर्व धुळधाण ॥ जी०॥ चाल– काय कार्यक्रम आंखला । लोकसंग्रह कैसा केला । सारांश सांगतों दादांनो द्यावं कानाला । भिक्षार्थ गावामधें यावं । घरासमोर येतां च उभं राहावं । खड्या सुरांत श्लोक म्हणावे । खडबडुन ज्यानं जागृत लोक सारे व्हावे । आली भिक्षा तेवढ्यांत, तर घ्यावी । ती मूठ एक च असावी । अधिकाची आशा नसावी । समाधानवृत्ति ठेवावी । आनंदी मुद्रा राखवी । कीं वाटावं लोकांना अशी स्वारी सदा घरीं यावी ॥ देवळांत ठाण मांडावं । कोणाच्या घरीं न उतरावं । निरूपणकथाकीर्तनानं लोक जमवावे । उत्सावाच्या योगानं कार्याचं वेड लावावं । खऱ्या राष्ट्रधर्माचें रूप समजुनी द्यावं । निजसमाजस्थिति नि कर्तव्य काय सांगावं । मोठेपणाच्या मोहपाशांत मुळीं न गुंतावं । सन्मार्ग ऐसा दाखवुनी आपण निसटावं । असं कार्य करून नामावेगळं स्वतः राहावं । गांवोगांवीं मठ स्थापावे । उपासनेचे आखाडे काढावे । बलभीम प्रतीक ठेवावें । कीं शक्तिबुद्धियुक्तीनं सर्व भरावे । संघटना करून एका सूत्रामधें गोवावे । दर रामनवमीला परीक्षून सोडावे । हें समर्थ-संप्रदायाचें स्वरूप समजावें । ज्यानं अभ्युदयनिश्रेयस सहज साधावें । महाराष्ट्रधर्माचें हें च ध्येय जाणावें ॥ जी० ॥ चाल०– शिस्तीनं कार्य चालतें । त्याला सुयशफळ लाभतें ॥ जी० ॥

* * * *

पोवाडा गायिला जात असतां मधून मधून श्रोत्यांकडून गुणग्राहकतेच्या व आनंदाच्या टाळ्या पडत होत्या. पोवाडा संपल्यावर श्री. आबासाहेब महाराज यांची स्वारी दरबारांत येऊन दाखल झाली. या सुमारास परतुडचे श्री. बाळकृष्णपंत वकील साहेब यांनीं स्वरचित मोरोपंती वळणाच्या श्रीसमर्थचरित्रपर त्रेचाळीस आर्या वाचून दाखविल्या. त्यांपैकीं पहिली एक आणि शेवटच्या तीन आर्या येथें देतों.

धन्य श्रीगोदावरि उद्भववी सतत संतसंततिला ।
दे मुक्ति दर्शनें जी जातिल सोडोनि केंवि संत तिला ॥ १

गेले समर्थ गेला शिवराजा पसरलें जनीं दैन्य ।
म्हणुनि प्रतीकरूपें आले द्याया पुन्हां सुचैतन्य ॥ ४१

वेदवायुवसुवसुधा ( १८५४ ) शाकीं मधु शुक्ल नवमि भृगुवारीं ।
मध्यान्हीं सुमुहूर्तीं स्थापियली दासमूर्ति जंबुपुरीं ॥ ४२
दर्शन घेतां वाटे सांपडला कोटि जन्मिचा ठेवा ।
सुमनें हीं स्तुतिसुमनें अर्पितसे अज्ञ बाल पदिं ठेवा ॥ ४३

या हि सर्व आर्या केव्हां तरी छापून निघाल्या पाहिजेत. नंतर चिटणीसांनीं अहवाल सादर करण्यास सुरवात केली. आतांपर्यंत झालेल्या कार्याची हकिकत सांगून त्यांनीं भावी कार्याची दिशा दर्शविली. आतांपर्यंत श्रीसमर्थ-संप्रदायजीर्णोद्धारादि जीं कार्यें झालीं, तीं श्री रामदासी मासिकाच्या वाचकांना विदित आहेत च, शिवाय येथवर जें वृत्त निवेदन झालें, त्यांत हि अहवालांतील कांहीं कांहीं भाग आला च आहे, तेव्हां तो सर्व देऊन पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. आतांपर्यंत झालेल्या कार्यांत बृहन्महाराष्ट्रांतील ज्या हजारों लोकांनीं मनोभावें मदत केली, त्या सर्वांचे त्यांनीं मनःपूर्वक आभार मानले. कोणत्या ना कोणत्या तऱ्हेनें आजपर्यंत अनेकांची मदत झाली आहे. ती कसकशी झाली हें विस्तार-भयास्तव न सांगितलें तरी या प्रसंगीं कांहीं प्रमुख

## उपकारकर्त्यांचें स्मरण

होणें साहजिक आहे. हिज एक्झॉल्टेड हायनेस निजाम सरकार, हि. ए. हा. निजाम स्टेट रेल्वे, हि. ए. महाराजा सर किसन प्रसाद बहादुर, राजा धनराजगीरजी, निजामसरकारचें धर्मखातें, औरंगाबादचे सुभेदार आणि तालुकदार, आंबडचे तहसिलदार, श्री. पांडुरंगराव जोशी, नामदार केशवराव कोरटकर, कै. दिगंबरदास वगैरे थोर मंडळींची अप्रतिम मदत झाली. या कामीं श्री. वामन नाईक साहेब यांची झालेली मदत बिनतोड आहे. त्यांच्या मदतीवांचून या कार्याचा आरंभ न होता व शेवट हि न होता. अशी साद्यन्त ज्यांची मदत झाली त्यांचे उपकार किती मानावे ? अहमदाबादचे अनंत सखाराम वणीकर, इंदुरच्या श्रीमंत सौ. मातुःश्री महाराणी इंदिराबाई साहेब होळकर, मुंबईचे श्री. गोडसे शास्त्री आणि निजामाबादचे श्री. नरसा गौडा साहेब यांनीं केलेली मदत विख्यात

आहे. श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी संस्थान औंध, श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन संस्थान मिरज, श्रीमंत सौ. राणीसाहेब संस्थान सांगली आणि श्रीमंत नानासाहेब निंबाळकर संस्थान फलटण, अशा सारख्यांनीं केलेली मदत इतरांस मार्गदर्शक होत असते. आजपर्यंतची परंपरा पहातां श्री. आबासाहेब महाराज हे श्रीरामनवमीस खरोखर चाफळास असावयाचे, पण समारंभाचें महत्त्व जाणून त्यांनीं समारंभास येण्याचें कबूल केलें हे त्यांचे महदुपकार होत. श्री. तात्यासाहेब केळकर, श्रीमंत जगन्नाथ महाराज, श्री. नारायणराव गुंजाळ, श्रीमंत माधवराव किबे साहेब, प्रो. माणिकराव, श्री. केशवराव पुराणिक, श्री. आप्पासाहेब आळतेकर, काका कारखानीस, मिरजेचे दामोदर मोरेश्वर भट, भा. इ. सं. मंडळाचे दत्तात्रय विष्णु आपटे आणि दिनकर विनायक काळे, नवभारतग्रन्थमालेचे प्रो. श्री. ना. बनहट्टी, हिस्लॉप कॉलेजचे प्रो. शं. दा. पेंडसे, पुण्याचे भारतस्नेहसंवर्धकमंडळ, अकोल्याचे वासुदेवराव चिपळूणकर, विलेपार्ल्याचे भवानीशंकर, मंगळूरचे बालहरिदास, निजामाबादचे श्रीसमर्थदास, मिरज, डोमगांव, तंजावर वगैरे मठांचे अधिपति, मुंबईचे अंबादास पुणतांबेकर, ना. पां. नवरे, कोल्हापुरचे शिवराम बाळाजी उपळेकर, मोरोपंतांचे पंत पराडकर, दौंडचे भगवंतराव देवस्थळी, वगैरे अनेकांनीं पत्रें पाठवून जी सदिच्छा प्रकट केली, तिजबद्दल मला या सर्वांचे फार उपकार वाटले. केसरी, नवाकाळ आणि ज्ञानप्रकाश या संस्थांनीं आपले खास बातमीदार जांबेस पाठवून जो या समारंभाचा गौरव केला, त्याचें महत्त्व विशेष होय. नव्या काळानें तर आपला एक फोटोग्राफर मुद्दाम पाठवून अनेक प्रसंगांचे फोटो काढून नेले व त्यांपैकीं कित्येक आपल्या दैनिक पत्रांत देऊन आपल्या वाचकांचें लक्ष या समारंभाकडे वेधून घेतलें. इतर महाराष्ट्रीय पत्रकारांनीं हि या कार्याची आवश्यकता जाणून त्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला, याबद्दल मी त्यांचा हि आभारी आहे. सरते शेवटीं, या कार्यांत आरंभापासून आतांपर्यंत म्हणजे गेल्या साडेतीन वर्षांत ज्या एका गृहस्थास आम्ही सारखा त्रास दिला व जो

त्यांनीं मोठ्या आनंदानें सहन करून आम्हांवर उपकाराचे डोंगर करून ठेवले व ज्यांच्या उपकाराचें मला सारखें स्मरण असून हि मी आतांपर्यंत ज्यांचा उल्लेख केला नाहीं, त्या गृहस्थाचे आभार मानून मग भावी कार्यांकडे वळतों. जांबेस पोस्ट ऑफिस नाहीं, मनीऑरडरी किंवा इन्शुअर्ड पत्रें पाठविण्याचें साधन नाहीं. परतुडास उतरल्यावर कोणाकडे तरी सोय झाल्यावांचून एकदम बैलगाडीनें जाणें त्रासदायक होतें. जांबेस पाठवावयाचा माल परतुडास कोणी तरी आपणांसाठीं घेऊन ठेवला पाहिजे होता. इत्यादि अनेक बाबतींत परतुडस्टेशनवर सोय व्हावी म्हणून जणूं श्री. त्र्यंबक भिकाजी लिमये यांची परतुडास स्टेशन मास्तर म्हणून नेमणूक झाली होती. जांबेस जाणारास परतुडास हें एक घर च झालें होतें. त्या घराचा गेल्या साडेतीन वर्षांत अशा रीतीनें आम्हांस च तेवढा उपयोग झाला असें नसून परवा समारंभाचे प्रसंगीं जे शेंकडो पाहुणे परतुडमार्गानें आले व गेले त्या सर्वांची स्टेशन मास्तर यांनीं सोय पाहिली. आमच्यापासून त्यांना गेल्या साडेतीन वर्षांत खरोखर च अति त्रास पोंचला, पण तो त्यांनीं मानला नाहीं, हे त्यांचे श्रीसमर्थकार्यावर फार उपकार झाले आहेत.

पण, अजून बृहन्महाराष्ट्राच्या मदतीची मी अपेक्षा करीत आहे. मंदिराच्या आवारांतील जीं कामें व्हावयाचीं राहिलीं आहेत, तीं थोडीं आहेत. तीं आतां होतील. त्यांच्या पुरता पैसा शिल्लक आहे. त्यांच्या-साठीं मदत नको. पण त्यांशिवाय आणखीं जीं कामें झालीं पाहिजेत, असें मनांत येतें, त्यांच्यासाठीं मी आपल्या सर्वांच्या मदतीची याचना करीत आहे. जें कार्य योजिलें आहे तें आपणांस पटेल तर च मदत करा. आपण केलेल्या मदतीचा विनियोग सर्वथैव योग्य होत आहे, अशी आपली खात्री होत असेल, तर च श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारमंडळास पैसा द्या, एरव्हीं देऊं नका. तुम्हांस ठाऊक आहे, या कार्याचा

## जमाखर्च चवाठ्यावर

ठेवलेला आहे. तो श्री रामदास आणि रामदासी मासिकांत नियमित

येत असतो. ही जमा, हा खर्च आणि ही शिल्लक असा तपशीलवार जमाखर्च दिला जातो. त्यावर आपण सारखी नजर ठेवीत जा, अशी माझी सर्वांस विनंति आहे.

## श्रीसमर्थमंदिर हें सर्वांचें आहे,

तें बृहन्महाराष्ट्राचें आहे, तें तुमचें आहे. त्याचा अभिमान तुम्हां सर्वांस पाहिजे. नुसतें मंदिर बांधणें हें कांहीं ध्येय असूं शकत नाहीं. मला तर आतां असें वाटूं लागलें आहे कीं, हें जें आपण शिखर पहात आहोंत, तें या मंदिराचें शिखर असेल, पण तें भावी कार्याचा पाया होय.

## शिखर हा पाया

आहे. येथून पुढें जीं कार्यें व्हावयाचीं त्यांचें उगमस्थान म्हणजे हें मंदिर होय. हें स्थान महाराष्ट्रांतील लोकांना स्फूर्तिदायक झालें पाहिजे. महाराष्ट्रांतील हजारों तरुणांनीं श्रीसांप्रदायिक वाङ्मयाचा अभ्यास करून येथें येऊन श्रीसमर्थांचा संदेश मिळविला पाहिजे. आपआपल्या गांवीं, आपआपल्या घरीं प्रत्येकानें या जिवंत वाणीचा अभ्यास करावा, श्रीसमर्थचरित्राचें चिंतन करावें आणि येथें येऊन श्रीसमर्थांचा दिव्य संदेश घेऊन जावें. या ठिकाणीं श्रीसमर्थांचा जन्म झाला, त्या ठिकाणीं आपण त्यांचा ध्यास घेऊं तर त्यांचा साक्षात्कार झाला च पाहिजे. या स्थानाचा ओढा सर्वांना लागेल, अशी रमणीयता त्या स्थानाला आणून देण्याची जबाबदारी आपणां सर्वांवर आहे. त्या दिशेनें अल्प प्रयत्न म्हणून

## मंदिराचे कांहीं नियम

केले आहेत. ते सर्वांना कळावे व अत्यन्त सक्तीनें त्यांचें पालन व्हावें, म्हणून ते येथें कायमचे देऊन ठेवतों. श्रीसमर्थमंदिराच्या आवारांतील निर्मलता आणि रमणीयता इतकी स्वर्गतुल्य असावी कीं, एकदां आवारांत पाऊल टाकल्यावर चित्त शांत आणि प्रसन्न होऊन पुनरपि

बाहेर पडण्याचें आंत जाणाऱ्याच्या जिवावर यावें. त्यासाठीं पुढील कडक निबंध घालण्यांत येत आहेत. ते सर्वांनीं अत्यन्त कठोरपणें स्वतः पाळावे व इतरांकडून त्यांचें पालन करवावें. त्या नियमांचा भंग झालेला कोणी हि सहन करूं नये. ते नियम असे :

श्रीसमर्थमंदिराच्या प्रकाराच्या आंत कोणी हि

( १ ) तोंडांत विडा, विडी ठेऊन जाऊं नये,

( २ ) विडा खाऊं नये, विडी पिऊं नये,

( ३ ) जोडा घालून जाऊं नये किंवा नेऊं नये,

( ४ ) कोठें हि थुंकूं नये, शिंकरूं नये,

( ५ ) कोठें हि चूळ टाकूं नये,

( ६ ) चूळ किंवा चुलीसारखें कांहीं पेटवूं नये,

तात्पर्य

( ७ ) निर्मलपणाला आणि पवित्रपणाला बाध येईल, असें कांहीं हि करूं नये.

अंतर्बाह्य शुद्ध होऊन आंत जावें. पूजा करणाराचा मुकटा असो किंवा धोतर असो, तें वस्त्र स्वच्छ आणि रोज धुऊन सोंवळ्यांत टाकलेलें असावें. सर्व च नियम सांगतां येतील असें नव्हे. अंतर्बाह्य शुद्धतेविषयीं सर्वांचा कटाक्ष असावा, एवढा च या नियमांचा मतलब आहे.

याचशा काय, पण आपल्या सर्व देवालयांत अशी कडक शिस्त असावयास पाहिजे. इतर सर्व देवालयांना हें मंदिर मार्गदर्शक होईल, अशी काळजी आपण घेतली पाहिजे. या नियमांचा जो भंग करील त्यास श्रीसमर्थांचा शाप लागेल. हे नियम पाळले जात नाहींत याचें, माझ्या समजुतीनें, एक च कारण संभवतें. मंदिरांत प्रत्यक्ष देव वास करीत आहेत, अशी आपली समजूत नसते, म्हणून आपण मंदिरांत हि वेड्यासारखें आचरण करीत असतो. साक्षात् श्रीसमर्थ तेथें बसले आहेत, असें जो भावील, तो मूर्खासारखें वर्तन त्यांच्या समोर कधीं करील काय ? आपल्या सर्वांच्या चरणांना स्पर्श करून माझी सर्वांना

प्रार्थना कीं, श्रीसमर्थांनीं येथें रहावें, अशी आपली इच्छा असेल तर या नियमांचें आपण शब्दशः पालन केलें च पाहिजे. प्राणांतीं हि या नियमांचा भंग होऊं देऊं नका. याशिवाय

## पुजाऱ्यांसाठीं एक कडक नियम

केलेला आहे :

" श्रीसमर्थमूर्तीची पूजा फक्त नेमलेल्या पूजाऱ्यांनीं च करावयाची. ती अत्यन्त सावधानपणें झाली पाहिजे. पूजाऱ्यानें भांबावलेल्या मनानें मंदिरांत पाऊल हि टाकतां कामा नये. मूर्तीचे षोडशोपचार फक्त दर एकादशीला व्हावे. एरव्हीं प्रत्यहीं जरूर तर पिळलेल्या ओल्या फडक्यानें, नाहीं पेक्षां कोरड्या फडक्यानें मूर्ति हळूं च पुसावी, पुसण्यापेक्षां हि बारीक वस्त्रानें सावकाश झटकून काढावी. श्रीसमर्थांच्या अंगाला लागणारीं वस्त्रें दुसरीकडे वापरतां कामा नये. तीं वस्त्रें पूजाऱ्यांनीं स्वतः धुवावीं व सोवळ्यांत वाळत टाकावीं. "

या नियमाची किती अवश्यकता आहे, हें सर्व जण जाणत च आहेत. भांबावलेल्या पुजाऱ्यांच्या हातून आजपर्यंत सर्वत्र किती घोर पातकें घडलीं आहेत, याची कल्पना आपणांस आहे च. त्या पातकांचें नुसतें स्मरण झालें तरी अंगावर शहारे येतात. या पुजाऱ्यांनीं धांदलीनें पूजा करतांना आजपर्यंत कित्येक प्रख्यात ठिकाणीं कित्येक देवतांचे हातपाय मोडले आहेत, डोळे फोडले आहेत, कान तोडले आहेत, फार काय, पण मुखकमलें हि उडविलीं आहेत ! याचीं उदाहरणें माझ्या डोळ्यापुढें आहेत, पण तीं मला उच्चारवत नाहींत, त्यांच्या नुसत्या स्मरणानें हि मन विकल होतें, तीं तुम्ही जाणत च असाल ! अशा आम्हां पाप्यांना देव पावत नाहीं, आम्हांस या स्थितींत ठेवीत आहे, याबद्दल कष्टी होण्याचा आपणांस काय अधिकार आहे ? म्हणून किंचित् निष्ठुर होऊन म्हणतों कीं, श्रीसमर्थमंदिराच्या बाबतींत जो या नियमांचा भंग करील तो घोर पातकाचा धनी होईल !

चिटणीसांनीं हकिकत सांगितल्यावर श्री. आबासाहेब महाराज यांच्या आज्ञेवरून चाफळचे प्रमुख गृहस्थ श्री. विष्णुपंत देशपांडे यांनीं जाहीर केलें कीं, देवांनीं सांगितल्याप्रमाणें नूतन श्रीसमर्थमंदिर सर्वांचें आहे एवढें च नव्हे, तर जांब, चाफळ आणि सज्जनगड येथील पूर्वींचीं श्रीरामदेवस्थानें सुद्धां सर्वांचीं च आहेत, महाराज हे त्या देवस्थानांचे केवळ वहिवाटदार आहेत. महाराजांच्या पूर्वजांनीं अशा अर्थाची यादी पूर्वीं च सरकारांत सादर केलेली श्री. विष्णुपंत यांनीं वाचून दाखविली व सांगितलें कीं, या च यादीला अनुसरून श्री. आबासाहेब महाराज यांनीं हि नुकता च सरकारांत जबाब दिला आहे. अशा स्थितींत पूर्वींच्या देवस्थानांना जें कर्ज झालें आहे त्याची हि चिंता सर्वांनीं करावी, अशी विष्णुपंतांनीं विनंति केली.

शेवटीं श्री. वामन नाईक साहेब यांचें भाषण झालें. त्यांनीं आरंभीं विष्णुपंतांच्या विनंतीसंबंधानें सांगितलें कीं, त्या देवस्थानांच्या बाबतींत लोकांचें आणखी कांहीं म्हणणें आहे, त्याचा समाधानकारक उलगडा झाला म्हणजे श्रीसमर्थमंदिराप्रमाणें त्या हि देवस्थानांची चिंता जनता करील. नंतर श्रीसमर्थमंदिर हें महाराष्ट्रधर्माची मुहूर्तमेढ कशी आहे, तें नाईकसाहेबांनीं विशद करून सांगितलें. त्यांनीं हि सर्वांचे आभार मानले. त्यांत हि. ए. हा. निजामसरकार, महाराजा सर किसन प्रसाद बहादुर, राजा धनराजगीरजी, कै. दिगंबरदास, श्री. रामचंद्रराव वकील साहेब वगैरे प्रमुख सहाय्यकर्त्यांचे त्यांनीं विशेष आभार मानले. हैद्राबादेस नुकत्या च झालेल्या विवेकवर्धिनी सभेच्या वेळीं संस्थानच्या फायनॅन्स मेंबरनें महाराष्ट्राविषयीं जे उदारपणाचे उद्गार काढले होते, ते सांगून त्यांनीं त्यांचे हि आभार मानले. नंतर अनंत शाहीर यांचा संपूर्ण पोवाडा पुन्हां ऐकण्याची इच्छा सर्वांनीं दर्शविल्यावरून तो त्यांनीं पुन्हां म्हणून दाखविला. शेवटीं आभारप्रदर्शन होऊन, साडे सहाला सुरू झालेलें दरबारचें काम नवाच्या सुमारास श्रीसमर्थांच्या जयजयकारांत समाप्त झालें.

स्वाहाकार आणि अर्चा हीं अनुष्ठानें चालू असतां पहिल्यापासून च

## इतर विविध कार्यक्रम

सुरू होता. प्रतिपदेच्या पूर्वीपासून गांवची मंडळी रात्रींची जमूं लागली. श्रीसमर्थांचें बाळपणापासूनचें चरित्र, जांबेचें महत्त्व, जांबेच्या लोकांचें भाग्य, श्रीसमर्थमंदिराची आवश्यकता, जांबेच्या लोकांवरील जबाबदारी, इत्यादि अनेक गोष्टी त्यांना समजावून सांगण्यांत येत. चतुर्थीपासून प्रत्यहीं रात्रीं कथा, कीर्तनें, प्रवचनें, पोवाडे, हीं होऊं लागलीं. चतुर्थीच्या रात्रीं मलकापुरचे वे. महादेव गोपाळ पुरोहित यांचें प्रवचन झालें. पंचमीचे रात्रीं परळीचे वे. धरणीधर शास्त्री यांचें प्रवचन झालें. षष्ठीला रात्रीं प्रथम मंत्रजागर, नंतर श्री. चौंडेमहाराजांचें प्रवचन व शेवटीं पैठणकर पुराणिक यांचें पुराण, असा कार्यक्रम झाला. सप्तमीचे रात्रीं पुन्हां चौंडेमहाराजांचें प्रवचन झालें. अष्टमीस रात्रीं प्रथम शहागडचे श्री. रंगनाथ कृष्ण पुराणिक व लिंबचे श्री. अनंत सीताराम पुराणिक यांचीं पुराणें होऊन नंतर प्रथम श्री. विनायकमहाराज मसूरकर यांचें व नंतर पिंपळनेरचे श्री. राजाराम महाराज यांचें, अशीं दोन उत्कृष्ट व श्रोत्यांचीं मनें हदरून सोडणारीं प्रवचनें झालीं. दिवसाचे अवघे चोवीस तास अष्टमीच्या आणि नवमीच्या दिवशीं थोडे झाले. श्रीसमर्थांच्या दरबारांत हजेरी देण्यासाठीं अनेक गुणी जन आले होते. लोकांच्या उत्साहाला स्वाभाविक भरती आली होती. सभारंभ पाहून तेथल्या तेथें पोवाडे, अष्टकें, श्लोक रचण्यांत आले होते. आपली हजेरी श्रीसमर्थांपुढें लागावी, असें ज्याला त्याला साहजिक वाटे. तें न साधलें तर तळातळावर पोवाडे वगैरे गाण्याचे कार्यक्रम होऊं लागले. मी कोणास नाहीं म्हणणें शक्य नव्हतें, पण दिवसाचे चोवीस तास कमी पडत, तेथें माझा इलाज नव्हता. अष्टमीच्या आणि नवमीच्या रात्रीं स्त्रियांचीं हि कीर्तनें झालीं. नवमीच्या रात्रीं दरबारानंतर थोडा वेळ विश्रांति झाल्यावर प्रथम सांगलीचे श्रीगुरुभक्तिपरायण श्री. बाबुराव कोटनीस महाराज यांचें कीर्तन झालें. त्यांनीं आपल्या कीर्तनांत

गुरुभक्तीवर विशेष जोर देऊन श्रोत्यांचीं मनें हळुवार करून सोडलीं. या वेळीं रात्रीचे दोन वाजले होते. नंतर राष्ट्रीय कीर्तनकार श्री. पाटणकर यांचें सुमारें दीड तास कीर्तन झालें. नंतर श्रीसमर्थांची ऋग्वेदसेवा, यजुर्वेदसेवा, सामवेदसेवा, अथर्वणवेदसेवा, पंचांगश्रवणसेवा, पुराणश्रवणसेवा, संगीतसेवा, कंबुरवसेवा, इत्यादि सेवा होऊन शेजारती वगैरे होऊन नवमीचा कार्यक्रम संपतो तों दशमीचा अरुणोदय होण्याची वेळ आली.

दशमीस जांबगांवांत दुसरीकडे कोठें चूल पेटावयाची नव्हती. श्रीसमर्थांच्या घरीं सर्वांना प्रसादाचें आमंत्रण होतें. त्याप्रमाणें अठरापगड जातींच्या लोकांना श्रीसमर्थांचा प्रसाद मिळाला. प्रसाद सेवन करून

भक्तजन म्हणती देवा । आतां लोभ असूं द्यावा ।
पूर्वसुकृताचा ठेवा । भक्ति तुझी ॥

अशी श्रीसमर्थांची प्रार्थना करीत व आपसांत समारंभाच्या अपूर्वतेचें व श्रीसमर्थदर्शनसुखाचें वर्णन करून स्वतःचा आनंद द्विगुणित करीत परस्थ भक्तजन परतूं लागले. रात्रीं कामगार मंडळीस व गांवच्या पाटीलमंडळीस मानाचे नारळ देण्यांत आले. ‘ या स्थानास आपण केव्हां हि विसंबणार नाहीं, त्याची भक्तिपरंपरा चालवूं व सर्व प्रकारें साह्यता करूं ’ असा आपला कृतसंकल्प बाळाजी पाटील, देवराव पाटील, आप्पा पाटील, गोविंदा पाटील, राघो पाटील, बापु पाटील, यशवंत पाटील, दुसरे देवराव पाटील, मारुती पाटील, लक्ष्मण पाटील, परवता पाटील, संभु पाटील, सहादु पाटील, वगैरे तांगडे पाटील मंडळींनीं श्रीसमर्थांपुढें हात जोडून विदित केला. एकादशीपासून नित्यक्रमास सुरवात झाली.

याप्रमाणें हा ऐतिहासिक प्रसंग निर्विघ्नपणें पार पडला. ज्यांच्या कृपेनें हा दिवस उजाडला आणि असा अपूर्व सोहळा नजरेस पडला त्यांच्या चरणीं मस्तक ठेवून

## पुढें काय ?

असा प्रश्न तुझा मी तुला पुसतों सर्व भावें । त्याचें उत्तर जें मनांत येतें तें देतों.

## यापुढें

मला दिसत आहे कीं, श्रीसमर्थांच्या दर्शनास सारखे लोक येत जाणार. यापुढें या स्थानाची रमणीयता क्षणाक्षणाला वाढणार आहे. यापुढें या ठिकाणीं अनेक श्रीसमर्थभक्त अनुष्ठान करण्यास नेहमीं येत जातील. यापुढें या ठिकाणीं

## मासानां मार्गशीर्षोऽहम्

या भगवंताच्या विभूतीच्या मार्गशीर्ष महिन्यांत अनेक श्रीसमर्थाभिमानी श्रीसमर्थवाङ्मयोपासक एकत्र जमत जाणार आहेत. न जाणों, कदाचित् शंभर शंभर हि उपासक जमत जातील. ते आपआपल्या ठिकाणीं शांत चित्तानें जपजाप्य करतील, मननपूर्वक ग्रन्थांचीं पारायणें करतील, श्रीसमर्थचरित्राचे एकाग्र चिंतनांत स्वतःस विसरतील, आणि नियमित वेळीं एकत्र जमून चर्चा, सुखसंवाद करीत जातील. चर्चेंत शंका निघतील, त्यांचें समाधान होईल किंवा होण्याचें राहील, संप्रदायाचीं लक्षणें ठरतील, ग्रंथांचें रहस्य उलगडत जाईल, आत्मनिरीक्षण होईल आणि प्रत्येकाचीं आत्मोन्नतीच्या मार्गावर पुढें पुढें पाउलें पडत जातील. अशा रीतीनें त्या महिन्यांत ज्याला जितकी सवड होईल तितके दिवस तो जांबेस रहात जाईल. येत्या मार्गशीर्षापासून हा क्रम सुरू होईल. वर्षाच्या बारा महिन्यांपैकीं हा एक महिना श्रीसमर्थांचा, असें समजून सर्वांनीं त्या महिन्यांत जांबेस येत जावे, अशी माझी श्रीसांप्रदायिकांना, मित्रमंडळींना, लहानांना आणि श्रेष्ठांना नम्र विनंति आहे. याशिवाय

## दरसाल चैत्र शु. ७, ८, ९

स या ठिकाणीं श्रीसमर्थांचा जन्मोत्सव होत जाईल. यंदाचा आपण समारंभ

पाहिला च. यापुढें सालोसाल यात्रेचें प्रमाण वाढत च जाईल. हैद्राबादसंस्थानांतील ठिकठिकाणच्या प्रमुख मंडळींवर ही एक नवीन जबाबदारी येऊन पडणार आहे, पण या मंडळींचा जो मला अल्प परिचय झाला आहे, त्यावरून मी असें निश्चयानें म्हणूं शकतों कीं, असली पारमार्थिक जबाबदारी ते मोठ्या आनंदानें पतकरून उत्साहानें पार पाडीत जातील.

या कार्याला जांबक्षेत्राची भूमि फार अनुकूल आहे.

## जांब हें महाराष्ट्राचें हृदय

आहे. महाराष्ट्रधर्माच्या संस्थापकाचा त्या ठिकाणीं जन्म झाला म्हणून च केवळ मी असें म्हणतों असें नव्हे. तर भौगोलिक दृष्टीनें हि महाराष्ट्राकडे आपण पाहिल्यास जांब हें महाराष्ट्राच्या हृदयस्थानीं असल्याचें आपणांस आढळून येईल. एकादा हिंदुस्थानचा नकाशा हातीं घेऊन महाराष्ट्राकडे पहा. *

यापुढें कदाचित् जांबगांवास नकाशांत स्थान मिळेल, पण आतांपर्यंत हिंदुस्थानचे म्हणून जे नकाशे प्रसिद्ध झालेले असतील, त्यांपैकीं कोणत्या हि नकाशांत जांब गांव दिलेलें असल्याचा संभव नाहीं. स्थूलपणें बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, पैठण आणि परभणी हीं दोन शहरें एका रेघेनें जोडलीं तर त्या रेघेच्या मध्यभागीं जांबगांव येईल. जांबगांव हा मध्यबिंदु कल्पून त्यावर कंपास ठेवला व जांब ते इंदुर किंवा बैतुल, किंवा नागपुर, किंवा हैद्राबाद, किंवा बागलकोट, किंवा कोल्हापुर, किंवा श्रीवर्धन, किंवा मुंबई, किंवा वसई,

* हा काय योगायोग म्हणावा? येथवर मजकूर लिहून झाल्यावर आजचें टपाल आलें, म्हणून थांबून आलेलीं पत्रें फोडून वाचूं लागलों, तों एका थोर व्यक्तीच्या आज्ञेवरून आलेल्या पत्रांत मजकूर होता, तो असा :

" * * * प्रत्येक गृहांत असणारी देवखोली त्या गृहाचें हृदयस्थान ( Heart ) होय. ग्रामदेवता ग्रामाचें Heart होय. श्रीसमर्थांचें स्थान, महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र यांचें Heart व्हावें अशी भावना आहे. चारी वर्ण व चारी आश्रम यांस जाणणारें, त्यांतील जीवन शुद्ध करणारें, त्या सर्वांचें व्यक्तित्व कायम ठेऊन त्यांस एकजीव करणारें असें हें Heart * * घडून यावें * * * * "

किंवा नवसरी, किंवा धार अशी त्रिज्या धरून एक वर्तुळ काढलें तर जो प्रदेश व्यापला जाईल तो आपला महाराष्ट्र होय, असें स्थूलमानानें मानतां येईल. आणि खरें पाहूं गेल्यास पैठणजांब हा च भाग खरोखर प्राचीन महाराष्ट्राचें केंद्र होय. अशा या केंद्रस्थानीं सालोसाल श्रीसमर्थांचा जन्मोत्सव होऊं लागला म्हणजे वरचे, खालचे, पूर्वेचे, पश्चिमेचे, अष्टदिशांचे हजारों लोक उत्सवास लोटत जातील. ईशान्य कोपऱ्यांतील वऱ्हाड म्हणजे महाराष्ट्राचा चवथा भाग आहे, तो सबंध अकोलावाशिममार्गें मोटॉरीनें जांबेस उतरेल. विजापुरसोलापुरकडील दक्षिणेचे लोक परंडाबीडवरून वर जांबेकडे चढतील. बाकीच्या दिशां-कडील लोकांना आगगाडीचे मार्ग आहेत. निजामच्या राज्यांतील सबंध मराठवाडा दरसाल जांबेस येत जाईल, हें सहज च आहे. तात्पर्य, दुभंगलेला, त्रिभंगलेला महाराष्ट्र श्रीसमर्थांच्या इच्छेनें एकजीव होऊन यापुढें बृहन्महाराष्ट्रांतून जांबेकडे प्रचंड जनप्रवाह सारखा लोटत जाणार, हें निश्चित होय.

पुढें मागें निजामच्या राज्यांतील मोठमोठे लोक जांबेस आपआपले बंगले बांधतील, श्री. चौंडेमहाराज, श्री. विनायकमहाराज, श्री. नारायणमहाराज, श्री. श्रीसमर्थदासमहाराज वगैरे थोर श्रीरामदासी मंडळी आपआपल्या सोयीसाठीं लहानमोठ्या धर्मशाळा बांधतील. या सर्व गोष्टी पुढें घडतील, पण तूर्त सर्वांच्या उपयोगासाठीं श्रीसमर्थ-मंदिराच्या जवळपास

### नवीन चार इमारती

अवश्य झाल्या पाहिजेत त्या अशा : ( १ ) निवासस्थान, ( २ ) विद्यामंदिर, ( ३ ) संध्यामठ आणि ( ४ ) भांडारगृह. खुद्द मंदिरांत राहण्याला प्रतिबंध आहे. तेव्हां श्रीसमर्थमंदिराच्या सेवेसाठीं नित्य जे चार पांच निष्ठावंत रामदासी राहणार व नैमित्तिक प्रसंगानें जे अनेक येणार त्यांना राहण्यासाठीं एक निवासस्थान पाहिजे. ग्रन्थांचा संग्रह करण्याला, ठेवण्याला, स्वतः अभ्यासण्याला आणि इतरांस शिकविण्याला

विद्यामंदिर पाहिजे. निवांतपणें बसून जपजाप्य करण्याकडे संध्यामठाचा उपयोग होईल आणि भांडारगृह म्हणजे पाकशाला, तिच्या आश्रया-वांचून कोण जगला आहे ? पहिल्या दोन इमारतींना प्रत्येकीं पांच हजार व दुसऱ्या दोन इमारतींना प्रत्येकीं अडीच हजार, मिळून सुमारें पंधरा हजारांचीं हीं कामें जांबेस त्वरित झालीं पाहिजेत, असें वाटतें. शिवाय यापुढें

## मंदिराचा नित्यखर्च

दरमहा ८० ते १०० रुपये येणार आहे. व्याप वाढवावा तितका वाढवितां येईल. पण तूर्त श्रीसमर्थांच्या पूजेसाठीं व मंदिराच्या जोपासनेसाठीं चार पांच निष्ठावंत श्रीसमर्थभक्त तेथें राहणार आहेत. त्यांचा खर्च महाराष्ट्रानें चालविला पाहिजे. कोणाची सूचना अशी आहे कीं, त्यासाठीं एक पंधरावीस हजारांचा कायमनिधि उभारावा व त्याच्या व्याजांतून हा नित्यखर्च चालवावा. असा निधि जमविण्यांत येईल तेव्हां येईल, पण तों पर्यंत श्रीसमर्थाभिमानी सज्जनांनीं दरमहा नियमितपणें यथाशक्ति मदत करण्याचा अवश्य संकल्प करावा, अशी सर्वांना विनंति आहे. मी जीवांत जीव आहे तोंपर्यंत एवढी च खात्री देऊं शकेन कीं, सेवेसाठीं जे चार पांच जण ठेवण्यांत येतील ते पूर्ण निःस्वार्थी, निर्लोभी, निष्ठावंत, आचारविचारवान् असे च ठेवले जातील.

अखंड येकांत सेवावा । अभ्यास चि करीत जावा ।
काळ सार्थक चि करावा । जनासहित ॥

या श्रीसमर्थांच्या शिकवणीप्रमाणें जांबेस एकांतांत राहून अभ्यासानें श्रीसमर्थांचें अंतरंग जाणून व निदिध्यासानें श्रीसमर्थांची कृपा संपादन करून जनसेवेसाठीं बाहेर पडून देहाचे सार्थक करणारे, आपल्या अंतर्बाह्य वर्तनानें संप्रदायाला भूषविणारे, स्वतः तरून दुसऱ्यांस तारक होणारे दहा पांच श्रीसमर्थांचे एकनिष्ठ उपासक येथें राहूं लागले, तर अशांचा योगक्षेम चालविणें हें आपल्या सर्वांचें कर्तव्य आहे, असें मला वाटतें. म्हणून मी

## सर्वांच्या मदतीची याचना

करीत आहे. एकदां श्रीसमर्थमंदिराचें शिखर पाहिलें म्हणजे सुटलों, असें मी मानलें होतें, पण प्रत्यक्ष अनुभव मात्र असा आला आहे कीं, मी सुटलों तर नाहीं च, पण कायमचा गुरफटलों आहे. त्यांतून श्रीसमर्थ केव्हां सोडवितील तें खरें. तोंवर याचना सुटत नाहीं. हें सर्व कार्य चालावें म्हणून जांबेस च १५०० रुपयांस दोन चाहुर जमीन व एक मळा विकत घेण्यांत आला आहे. शिवाय धामणगांवचे जहागीरदार श्रीमंत नानासाहेब यांनीं ढोणेवाडी, ता. पाथरी, जि. परभणी येथील सर्वे नं. ३६, एकर २८, गुंठे १४ आकार रुपये २६८९ हा नंबर श्रीसमर्थांच्या सेवेसाठीं श्रीमंत बामन नाईक साहेब व शंकर श्रीकृष्ण देव यांच्या हवालीं केला आहे. या जमिनींचें काय उत्पन्न येतें, हें पुढील वर्षापर्यंत समजेल. जमिनीच्या उत्पन्नाची कोणती च शाश्वती धरतां येत नाहीं. तसें च निवासस्थानादि इमारती बांधण्यासाठीं श्रीसमर्थमंदिराच्या पूर्वेकडील ७२′ × ५०′ अशी बखळ जागा श्री. देवराम पाटील यांनीं व तिच्या जवळची च दुसरी बखळ जागा श्री. मारुती पाटील यांनीं बक्षिस करून दिली आहे. तेव्हां सर्वांनीं नियामितपणें मदत करावी, भिक्षा घालावी, अशी प्रार्थना आहे.

## याशिवाय इतर प्रचंड कामें

दिसत आहेत, पण मी काय करणार ? अगदीं निकडीचीं कामें व त्यांना येणारा खर्च विदित करून ठेवतों.

( १ ) सज्जनगडावरील लाजिरवाणें खंबाळें टांकें
स्वच्छ करणें, बांधून काढणें वगैरे .... वीस हजार रुपये

( २ ) सज्जनगडावर उत्सवाचे दिवसांत
स्त्रीपुरुषांची सकाळची निरनिराळी
सोय करणें .... .... .... दोन हजार रुपये

( ३ ) चाफळास श्रीराममंदिरा जवळील
घाटाच्या पांच च पायऱ्या बांधल्या
गेल्या आहेत, तो घाट पुरा करणें .... आठ हजार रुपये

( ४ ) डोमगांवीं कल्याणमहाराजांची समाधि
सीनानदीच्या प्रवाहामुळें धोक्यांत आहे,
तो धोका नाहींसा करणें .... .... दहा हजार रुपये

मिळून चाळीस हजारांचीं हीं कामें अगदीं जरूरीचीं आहेत. तीं वास्तविक तत्काळ झालीं पाहिजेत. तीं विशेष खर्चाचीं आहेत, असें हि म्हणतां येत नाहीं. दहा वीस मंडळी स्वतः मनावर घेतील आणि सबंध महाराष्ट्राचें मन वळवून घेतील, तर एका वर्षांत एवढी रक्कम गोळा करतां येईल. याशिवाय पुढें मागें झालीं पाहिजेत, अशीं अनंत कामें आहेत. त्यासाठीं थांबण्यास हरकत नाहीं म्हटलें तरी चालेल.

तूर्त श्रीसमर्थमंदिरविषयक कार्यांना सर्वांच्या मदतीची जरुरी आहे. मला स्वतःला तर असा विश्वास वाटतो कीं, खुद्द हिज एक्झॉल्टेड हायनेस निजामसरकार यांचे कडून हि

## श्रीसमर्थमंदिरास वर्षासन

मिळवितां येईल. कोणत्या हि राजाला त्याची सारी प्रजा सारखी असते, म्हणून माझा विश्वास अस्थानीं आहे, असें हि मला वाटत नाहीं. इतर हि लहानथोर मंडळींनीं आपआपल्या परी श्रीसमर्थांना वर्षासनें करून द्यावीं व त्यांच्या विनियोगावर सक्त नजर ठेवावी, अशी विनंति आहे.

श्रीसमर्थमंदिराचा वृत्तान्त संपला. तो सांगत असतां हातून अनेक चुक्या घडल्या असतील, कांहीं अप्रयोजकपणा झाला असेल, सांगावयास पाहिजे होतें असें कांहीं गाळलें गेलें असेल व न सांगण्यासारखें लिहिलें गेलें असेल, असे अनेक दोष घडले असतील, त्यांबद्दल

## वाचकांनीं क्षमा करावी

अशी विनंति आहे. सरते शेवटीं माझें

## महाराष्ट्रापाशीं एक च मागणें

आहे. रघुनाथभटांच्या निमित्तानें श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रास दिलेल्या

तुमचें मन मजवरी बहुत आहे ते तुमचे आवडीच्या
गुणे कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें

या आशीर्वादाचें स्मरण ठेवून, सर्वांच्या कल्याणासाठीं जांबेस अवतरलेल्या

## श्रीसमर्थचरणांना केव्हां हि अंतरूं नका,

श्रीसद्गुरुचरणांस शरण जाणें हें च राष्ट्राच्या कल्याणाचें अमोघ साधन होय, हें जाणून अभिमानपूर्वक या स्थानाला जागा, अशी प्रार्थना आहे. आणि आतां शेवटीं

## श्रीसमर्थांपाशीं काय मागूं ?

समर्थांपुढें काय मागों कळेना । दुराशा मनीं बैसली हे ढळेना ।
पुढें संशयो नीरसीं सर्व चिंता । समर्थ प्रभो मागणें हें चि आतां ॥

किंवा श्रीउद्धवस्वामींच्या शब्दांत मागणें मागावयाचें, तर

उदासीन हें सर्वदा वाटताहे । युगासारिखा दीन पोटीं न माये ।
बहु वेळ तां पाळिलें सर्व भक्तां । न ये बोलतां अंतरींची अवस्ता ॥

मला नावडे श्लाघ्यता मान कांहीं । धनें संपदेवीण ही चाड नाहीं ।
दुखें दाटती आंतडीं तुटताती । जळें लोटतीं लोचनीं दीनराती ॥

त्वरें पावणें धांवणें देवराया । श्रमें बाधितो सर्व व्याकूळ काया ।
दिनानाथ तां दीनचिंता करावी । प्रभु आमची वासना पूरवावी ॥

अशी प्रार्थना करावी. किंवा महाराष्ट्राच्या वतीनें मागणें मागावयाचें तर स्वतः समर्थांनीं च आपल्या समर्थांपाशीं जें मागणें मागितलें तें च आपण आपल्या समर्थांपाशीं मागूं या :

समर्थांनें समर्थ करावें । तरी च समर्थ म्हणवावें ।
त्रैलोक्यास पडिलें ठावें । सामर्थ्य ज्याचें ॥



Registered No B. 1321



## विज्ञप्ति

( १ ) श्रीसमर्थमूर्तिस्थापनेच्या वेळचा थोडा जमाखर्च अजून द्यावयाचा राहिला आहे.

( २ ) मासिकाच्या वर्गणीदारांस विनंति कीं, आणखी एक वर्ष मासिकास वर्गणीदार रहा, पुढच्या वर्षी तुमच्या मर्जीप्रमाणें करा. व्ही. पी. करावयास लावूं नका. वर्गणी रुपये तीन मनीऑर्डरीनें पाठवा. ज्यांच्या कडे व्ही. पी. जाईल त्यांनीं व्ही. पी. चा स्वीकार करावा. पुढील अंकापासून आतां गेल्या २८ वर्षांतील संस्थेच्या वृत्ताकडे विशेष लक्ष द्यावयाचें आहे. तें वृत्त आपणांस उपयुक्त आणि मनोरंजक वाटेल.

चिटणीस

सत्कार्योत्तेजक सभा--धुळें

१८५४ वैशाख व. ११